# मराठी टंकलेखन प्रवेशिका



भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन

शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे

१९९३

किंमत : रु. २९-००

## प्राक्कथन

शासनमान्य नवीन कळफलकाची मराठी टंकलेखन यंत्रे निरनिराळ्या शासकीय कार्यालयांना पुरविल्यानंतर त्यावर टंकलेखनाचा अभ्यास कसा करावा याचे दिग्दर्शन करणारी छोटीशी पुस्तिका तातडीने तयार करण्याची गरज निर्माण झाली. त्यानुसार ही "मराठी टंकलेखन प्रवेशिका" तयार करण्यात आली आहे.

शासकीय कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त ज्या अन्य व्यक्तींना नवीन कळफलकाच्या यंत्रावर मराठी टंकलेखन शिकावयाचे असेल त्यांनाही या प्रवेशिकेचा उपयोग होईल.

ही पुस्तिका तयार करण्याच्या कामी श्री. व. वा. इनामदार, सहायक संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन व श्री. द. आ. कर्णिक, प्रतिवेदक, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय यांनी जे परिश्रम घेतले त्याबद्दल शासन त्यांचे आभारी आहे.

वा. ना. पंडित
भाषा संचालक व उप सचिव
महाराष्ट्र शासन

सचिवालय, मुंबई
दिनांक ७ डिसेंबर १९६८

## पाचव्या आवृत्तीची प्रस्तावना

''मराठी टंकलेखन प्रवेशिका'' या पुस्तिकेची ही पाचवी आवृत्ती प्रकाशित करताना मला आनंद वाटतो.

ही पुस्तिका मूलतः शासकीय कार्यालयांतील इंग्रजी टंकलेखकांना व लघुलेखकांना मराठी टंकलेखन शिकण्यास सहाय्य व्हावे या हेतूने प्रकाशित करण्यात आली होती. परंतु वरील कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त इतरांनाही ती मराठी टंकलेखन शिकण्यासाठी अतिशय उपयुक्त ठरल्यामुळे तिला बरीच मागणी आहे.

चौथ्या आवृत्तीत काही सुधारणा करुन ही पाचवी आवृत्ती प्रकाशित करण्यात येत आहे. या कामी निवृत्त सहायक संचालक श्री. इनामदार तसेच संचालक, शासन मुद्रण व लेखन सामग्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई आणि त्यांचा अधिकारी वर्ग व व्यवस्थापक, शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे यांनी जे बहुमोल सहकार्य दिले त्याबद्दल मी या सर्वांचा आभारी आहे.

प. ग. पाटील
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

मुंबई.
दिनांक १ मे १९९३.

## मराठी टंकलेखनाकरिता शासनमान्य कळफलक



## कळफलकासंबंधी टीप

(मागील पृष्ठावरील कळफलकाचा तक्ता पाहा)

(१) आपण ज्या पद्धतीने लिहितो त्याच पद्धतीने या कळफलकावर टंकलेखन करता येते. म्हणजे लिहिताना जी स्वरचिन्हे व इतर चिन्हे पूर्ववर्ती व्यंजनानंतर लिहिली जातात ती या कळफलकावर त्याच पद्धतीने टंकलिखित करावयाची आहेत.

(२) ◎ या कळा अचल कळा आहेत. म्हणजे त्या कळांवर आघात केला असता रूळ सरकत नाही.

(३) कळ क्रमांक ३१/२ मधील अधोचिन्हाचा उपयोग काना म्हणून करावयाचा आहे. कळ क्रमांक ३/९ मधील ऊर्ध्वचिन्हाचा उपयोग ट, ट, ङ, ड, छ, झ, द, ढ, ठ, श, आणि ही अर्धाक्षरे पूर्ण करण्याकरिता करावयाचा आहे व अधोचिन्ह अनुस्वाराचे चिन्ह आहे.

(४) कळ क्रमांक ४/४२ मधील अधोचिन्ह हे रुकाराचे चिन्ह आहे. जसे : कृ, तृ. ऊर्ध्वचिन्ह हे हलन्त चिन्ह आहे. जसे : प्, म्, त्.

(५) कळ क्रमांक ५/२६ मधील अधोचिन्ह हे डाव्या बाजूने खालून जोडावयाच्या "र" चे चिन्ह आहे. जसे : प्र, भ्र. ऊर्ध्वचिन्ह हे 'रफारा' चे चिन्ह आहे. जसे : र्व, र्क, र्त.

(६) कळ क्रमांक १/४६ मधील ऊर्ध्वचिन्ह हे शिरोदंडित अक्षरांना खाली जोडावयाच्या "र" चे अथवा काकपदाचे चिन्ह आहे. जसे: ट्र, ड्र. अधोचिन्ह हे हिंदी भाषेतील नुक्ता चिन्ह आहे. त्याचा उपयोग १ या आकड्याशी संयोग करून प्रश्नचिन्ह बनविण्याकरिता करावयाचा आहे.

(७) कळ क्रमांक २/२९ मधील ऊर्ध्वचिन्ह "प" पासून "फ", "उ" पासून "ऊ" आणि "र" पासून "रु" बनविण्याकरिता उपयोगात आणावयाचे आहे.

(८) कळ क्रमांक ४६/४४ मधील अधोचिन्हाचा उपयोग दशांश चिन्हासाठी, "ड" पासून "ड़" बनविण्याकरिता आणि पूर्णविरामाकरिता करावयाचा आहे. या चिन्हाचा १ या आकड्याशी संयोग करून प्रश्नचिन्ह व स्वल्पविरामाशी संयोग करून अर्धविरामही बनवता येतो.

(९) कळ क्रमांक २४/३६ मधील ऊर्ध्वचिन्ह हे संयोगचिन्ह असून त्याचा उपयोग "=" या अर्ध्या "र" च्या चिन्हाकरिताही करावयाचा आहे. तसेच, रूळ जरुरीपुरता वर फिरवून अधोरेखेकरिताही त्याचा उपयोग करावयाचा आहे. कळ क्रमांक १६/३३ शी त्याचा संयोग करून अग्रचिन्ह (:—) बनविण्याकरिताही त्याचा उपयोग करावयाचा आहे.

# काही प्रारंभिक सूचना

टंकलेखन करण्यास सुरुवात करण्यापूर्वी टंकलेखन यंत्रातील निरनिराळे नित्योपयोगी भाग आणि त्यांचे उपयोग यांची माहिती करून घ्या. यंत्राचा वापर करताना तो धसमुसळेपणाने न करता अगदी हळुवारपणे आणि सफाईदारपणे करा.

जलद व बिनचूक टंकलेखन करता येण्याकरिता ते स्पर्श पद्धतीने (Touch system) शिकणे आवश्यक आहे. स्पर्श पद्धतीने टंकलेखन करणे म्हणजे कळफलकाकडे मुळीच न पाहता टंकलेखन करणे.

प्रत्येक अक्षर वा चिन्ह त्यासाठी नियुक्त केलेल्या बोटानेच टंकलिखित करणे आवश्यक आहे. त्याव्यतिरिक्त दुसऱ्या बोटाचा उपयोग चुकूनही होता कामा नये.

टंकलेखन करण्यासाठी कळांवर बोटांची फक्त टोके टेकवावीत आणि ती टेकविताना बोटांना पंजाप्रमाणे वाक द्यावा. बोटे कळांवर सपाट ठेवू नयेत.

टंकलेखनाचा सराव करताना कळफलकाकडे किंवा बोटांकडे मुळीच पाहू नये. जो मजकूर टंकलिखित करावयाचा असेल त्यावरच दृष्टी पूर्णत: खिळली पाहिजे.

कळांवर आघात करताना तो हळुवार स्पर्शाने आणि द्रुतगतीने करावा. आवश्यक ते अक्षर वा चिन्ह टंकलिखित करून झाल्याबरोबर लगेच कळेवरील बोट त्याला चटका बसल्याप्रमाणे कळेवरून काढून घ्यावे व पुढील टंकलेखनासाठी तयार ठेवावे.

ताल आणि स्पर्शसमता ही टंकलेखनाची आभूषणे आहेत. टंकलेखनाच्या दोन आघातांमध्ये समान अवकाश ठेवल्याने तालबद्धता साधते आणि प्रत्येक अक्षर वा चिन्ह टंकलिखित करताना कळांवर समान दाब दिला असता स्पर्शसमता साधते. या दोन्हींच्या संयोगामुळे टंकलेखन जलद व बिनचूक होऊन त्याचा थकवा वाटत नाही.

टंकलेखनाच्या गतीबरोबरच टंकलिखित करावयाच्या मजकुराच्या सौष्ठवपूर्ण मांडणीकडेही लक्ष ठेवणे आवश्यक आहे. कारण टंकलेखन किती केले याच्याइतकेच ते कसे केले यालाही महत्त्व आहे.

आता कळफलकाच्या तक्त्याचे काळजीपूर्वक निरीक्षण व मनन करा. कळफलक दोन भागांत विभागलेला आहे. डाव्या बाजूच्या भागातील अक्षरे वा चिन्हे टंकलिखित करण्यासाठी डाव्या हाताच्या बोटांचा उपयोग करावयाचा असून उजव्या बाजूच्या भागातील अक्षरे वा चिन्हे टंकलिखित करण्यासाठी उजव्या हाताच्या बोटांचा उपयोग करावयाचा आहे. वर सांगितल्याप्रमाणे आणि पुढे दिग्दर्शित केल्याप्रमाणे कोणतेही अक्षर वा चिन्ह टंकलिखित करण्यासाठी ठराविक बोटांचाच उपयोग करा. त्याव्यतिरिक्त दुसऱ्या बोटाचा चुकूनही उपयोग करू नका. तसेच, टंकलेखन करीत असताना कळफलकाकडे मुळीच पाहावयाचे नाही याचा कधीही विसर पडू देऊ नका.

## प्रारंभ

खुर्चीवर ताठ बसा. खांद्यापासूनचा हात सैल सोडा. बोटांना मध्ये पंजाप्रमाणे बाक द्या.

डावी करंगळी ' ` ' वर (' ए ' च्या मात्रेवर) ठेवा, अनामिका (करंगळीजवळचे बोट) ' क ' वर ठेवा, मधले बोट ऱ्हस्व वेलांटीवर ठेवा आणि तर्जनी (अंगठ्याजवळचे बोट) ' ह ' वर ठेवा.

उजवी करंगळी ' श ' वर ठेवा. अनामिका ' य ' वर, मधले बोट ' स ' वर आणि तर्जनी कान्यावर ठेवा.

कळेवर बोटाचे फक्त टोक आणि तेही अलगद टेकवावयाचे आहे याची आठवण ठेवा. बोटे पसरून ठेवावयाची नाहीत, हेही लक्षात असू द्या. तसेच, हाताचे मनगट टंकलेखन यंत्राच्या चौकटीवर रेलू न देता ते अधांतरी राहील याची काळजी घ्या.

## पाठ १

पुढील तक्त्याकडे पाहात व तोंडाने अक्षराचे वा चिन्हाचे नाव उच्चारीत प्रत्येक कळेवर बोटाच्या टोकाने हलकेच दाबत चला. प्रथम डाव्या हाताच्या कळा दाबा. डाव्या करंगळीने ' ` ' (' ए ' ची मात्रा), अनामिकेने ' क ', मधल्या बोटाने ऱ्हस्व वेलांटी व तर्जनीने ' ह ' ची कळ दाबल्यानंतर उजव्या करंगळीने ' श ' ची कळ दाबा आणि मग क्रमाने अनामिका, मधले बोट आणि तर्जनी यांनी अनुक्रमे ' य ', ' स ' व ' काना ' यांच्या कळा दावा :




वरील ओळ **एक पृष्ठभर टंकलिखित करा.**

**यानंतर** पुढील शब्द प्रत्येकी किमान **दहा वेळा टंकलिखित** करा. कळफलकाकडे अजीबात पाहावयाचे नाही आणि केवळ स्पर्शज्ञानाने नियोजित अक्षर वा चिन्ह टंकलिखित करण्याचे

शिक्षण बोटांना द्यावयाचे आहे हे लक्षात ठेवा. शब्द टंकलिखित करताना, त्या पद्धतीने आपण तो लिहू त्याच पद्धतीने तो टंकलिखित करा. उदाहरणार्थ, 'हे' हा शब्द टंकलिखित करताना प्रथम 'ह' हे अक्षर टंकलिखित करून मग '`' ची मात्रा टंकलिखित करावयाची आहे.

### अभ्यास १

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

कस, का, कास, काय, हा, हास, हाय, हाक, सय, यश, हे, सहा, शहा, हशा, सोस, कोस, कोश; किसा, सोय, शक, होय, शोक, किशा, शिका, शिया, हेका, होका, कयास, सायास.



पुढील तक्त्याचे मनन करा :




## अंतर-दंड

आता डाव्या हाताच्या करंगळीने ' ` ' ची कळ दाबा. हे करीत असताना तोंडाने 'ए' मात्रा असे म्हणा. मग ती करंगळी उचलून शेजारच्या डाव्या बाजूच्या कळेवर ठेवा आणि तोंडाने 'अनुस्वार' असे म्हणत लगेच ती कळ दाबा. करंगळी ताबडतोब पूर्वस्थिती-वर आणून तोंडाने "ए' मात्रा असे म्हणत पुन्हा ती कळ दाबा. असे किमान दहा वेळा करा.

वरीलप्रमाणेच डाव्या तर्जनीने 'ह्' ची कळ दाबा. पाठोपाठ तर्जनी उचलून दीर्घ वेलांटीची कळ दाबा. त्यानंतर लगेच तर्जनी पूर्वस्थितीवर म्हणजे 'ह्' च्या कळेवर आणून ती कळ दाबा. असे कमीत कमी दहा वेळा करा.

वरील पद्धतीनेच '.' आणि 'र' या कळांचा अभ्यास करा.

आता खालील ओळी एक पृष्ठभर टंकलिखित करा :



## अभ्यास २

पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :

ही, कर, की, रस, रास, सार, कहर, केश, रया, रंक, हेर, हिरा, शिर, कीस, शीर, शीक, कोय, सोय, काही, सिंह, हंसी, हिंसा, संकर, शंका, संसार, संहार, शहरी, शिके, शिका, शंकर, सोशिक, सोयर, सोयरीक.

---

## पाठ ३

**पुढील तक्त्याचे मनन करा :**




### अंतर-दंड

आता डाव्या तर्जनीने 'ह' ची कळ दाबा. मग तर्जनी वर उचलून 'ज' ची कळ दाबा. पुन्हा 'ह' ची कळ दाबा. याचप्रकारे डाव्या तर्जनीनेच 'ल' हे अक्षर टंकलिखित करण्याचा अभ्यास करा.

यानंतर उजव्या तर्जनीने कान्याची कळ दाबा. मग तर्जनी वर उचलून 'प' ची कळ दाबा. पुन्हा कान्याची कळ दाबा. याचप्रकारे उजव्या तर्जनीनेच 'न' हे अक्षर टंकलिखित करण्याचा अभ्यास करा. वरील कळा दाबताना तोंडाने संबंधित अक्षराचा वा चिन्हाचा उच्चार करा.

### अभ्यास ३

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

हल, रज, जर, नर, पर, जल, जप, जन, लय, लप, कप, काज, हाल, रान, नार, पाक, काप, पास, पीक, पीर, साप, पसा, सान, शाप, पाश, जाल, नेक, नेकी, हानी, पाल, शाल, नये, यान, शान, नशा, हेल, राजीं, राजा, लंका, केले, कोप, रोप, लोप, पोर, पंकज, जोर, रोज, लोक, जहर, लहर, नजर, जनक, पहार, जहाज, सजला, हलका, नाही, नको, नापिकी.

पुढील तक्त्याचे मनन करा :




अंतर-दंड

आता पाठ ३ मध्ये दिग्दर्शित केल्याप्रमाणेच डाव्या हाताच्या मधल्या बोटाने 'त', अनामिकेने 'म' आणि करंगळीने दीर्घ ऊकार व ऱ्हस्व उकार टंकलिखित करण्याचा सराव करा.

तसेच उजव्या हाताच्या मधल्या बोटाने 'व', अनामिकेने 'च' आणि करंगळीने 'ळ' आणि ',' हे चिन्ह टंकलिखित करण्याचा सराव करा.

यानंतर पुढील ओळी किमान एक पृष्ठभर टंकलिखित करा. हे करीत असताना संबंधित अक्षराच्या वा चिन्हाच्या नावाचा तोंडाने उच्चार करा. कळफलकाकडे चुकूनही पाहू नका.



## अभ्यास ४

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

मत, मल, मन, तन, तप, तम, जम, जत, जव, लव, नव, वच, नम, नत, पत, चव, चल, जन, तूर, तूप, मजा, पूत, चूल, तुला, जुना, चुना, खप, खच, खल, लख्ख, खवा, मख्ख, खूप, खून, मुख्य, वजन, मखर.

## अभ्यास ५

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

मेज, तेज, पेव, चेव, नेम, पेज, मूक, मुका, तूर, सूर, नूर, पूर, पुरा, पुरी, पंख, पंत, सूर, चुरा, मोका, तोरा, तीस, तिशी, मंचक, पंकज, खोती, तिला, पीर, वीर, नजर, तवा, जीव, शाल, सजा, शान, खूर, खीर, पास, पाय, माय, वाया, चहा, जोर, लाज, यम, तीन, हीन, हजर, हजरी, हशील, महान, लहान, जुनेरे, खुजी, तास, मास, वास, नाश, जाया, नयन, खोच, खरे, ताजीम, तालिका, वंचना, मलूल, खंजीर, संजीव, रंजना, खुशाली, महिना, मासिक, नाशिक, नासिका चुकार, मुजरा, किमान, विमान, माहिती, जमीन, जामीन, याचना, याचिका, खजिना, यामिनी, चिलखत, जोरकस, तुकाराम, चमचमीत, कमलिनी, जाहीरनामा.

## अभ्यास ६

**प्रत्येक वाक्य किमान पाच वेळा टंकलिखित करा :**

(१) संजीवने जरा जपूनच जावे.

(२) तुकाराममहाराज महान संत होते.

(३) मन लावून काम करा की सुयश तुमचेच.

(४) चूल व मूल हेच काही महिलांचे काम नाही.

(५) सख्या व श्याम यांनी यावर कितीतरी खल केला.

(६) मला काहीतरी काम लवकरच पाहिले पाहिजे.

(७) खरे पाहता तुमची ख्यालीखुशाली मला समजलीच नाही.

# पाठ ५

पुढील तक्त्याचे मनन करा :




## अंतर-दंड

आता 'ह' ची कळ दाबा. त्यानंतर तर्जनी हळूच उचलून खालच्या बाजूला आणा आणि 'अ' ची कळ दाबा. पुन्हा तर्जनी वर नेऊन 'ह' ची कळ दाबा. असे किमान दहा वेळा करा.

पुन्हा 'ह' ची कळ दाबा. मग तर्जनी खालच्या बाजूला आणून 'इ' ची कळ दाबा. तर्जनी पुन्हा वर नेऊन 'ह' ची कळ दाबा. असे किमान दहा वेळा करा.

याचप्रमाणे 'उ' आणि 'द' च्या कळांचा अभ्यास करा.

### अभ्यास ७

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

कद, साद, वाद, दही, दीर, दया, इह, आस, आत, आय, अशा, आव, आच, इजा, आशा, दार, दास, उवा, उमा, उचकी उदार, उदास, उशीर, इकार, असल, इवला, दालन, उवाच, आदर, इरादा, इसवी, अकरा, अहाहा, अहीर, अमला, अलका, अननस, इतका, इमला, दाखव, दिवस, इवलासा, इचलकरंजी.

### अभ्यास ८

**पुढील वाक्ये कळफलकाकडे न पाहता किमान पांच वेळा टंकलिखित करा :**

(१) मला सारखी उचकी येत आहे.
(२) देशाला आज शांततेची आवश्यकता आहे.
(३) अकरा वाजले. आता तुला खूप उशीर होत आहे.
(४) हे दही इतके ताजे आहे की तू ते जरूर चाखून पाहा.
(५) विमलला काल दहा वाजता विंचू चावला, परंतु अजून तिला वेदना होत आहेत.

# पाठ ६

पुढील तक्त्याचे मनन करा :

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ◯ | ◯ | ◯ | ◯ | ◯ | ◯ | ◯ | ◯ | ◯ | ◯ | ◯ | ◯ |
| ं | ृ | म | त | ज | ल | न | प | व | च | ख | , |
| ः | ॅ | क | ि | ह | ी | र | ा | स | य | श | . |
| कळबदल | ्र | ग | ब | अ | इ | द | उ | ए | ण | ध | कळबदल |

अंतर-दंड

आता पाठ ३ मध्ये दिग्दर्शित केलेल्या पद्धतीने डाव्या हाताच्या मधल्या बोटाने 'ब', अनामिकेने 'ग' व करंगळीने '्र' टंकलिखित करण्याचा सराव करा.

तसेच उजव्या हाताच्या मधल्या बोटाने 'ए', अनामिकेने 'ण' आणि करंगळीने 'ध' टंकलिखित करण्याचा सराव करा.

यानंतर पुढील ओळी किमान एक पृष्ठभर टंकलिखित करा. हे करीत असताना संबंधित अक्षराच्या वा चिन्हाच्या नावाचा तोंडाने उच्चार करा. कळफलकाकडे मुळीच पाहू नका.

्र (रकार) ग ब अ इ ----- डावा हात

द उ ए ण ध ----- उजवा हात

## अभ्यास ९

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

अग्र, उग्र, गण, दंगा, इंगा, गदा, आग, धग, गर, गरा, गार, गम, मग, गत, गज, नग, खग, गमन, गहरा, जगला, आम्र, नम्र, प्रधान, प्रकार, व्रण, अभ्रू, ग्रह, दगदग, धगधग, ग्राहक, बाब, बक, बाक, बरी, बरे, बस, दाब, बाम, बात, बाज, बाल, बाप, जबाब, बगल, बालक, बोनस, बहिरा, दबला, तबला, अबब, बसके, बलक, लकब, पोबारा, एक, ऐन, ऐक, ऐंदी, एकी, ऐहिक, ऐरण, बाण, गाणे, बाणा, धणे, कोण, रण, सण, मण, तण, लेणे, लोण, पण, चणे, खण, बाध, धाबे, धाक, धरणे, धनिक, धजला, धोरण, बधला, बांधील.

## अभ्यास १०

**पुढील परिच्छेद कळफलकाकडे न पाहता किमान पाच वेळा टंकलिखित करा :**

आता जी मागणी करण्यात आली आहे तीसंबंधी मी काही बोलणार आहे. या बाबतीत सरकारवर उगाच कोणी दबाव आणता कामा नये. यात एका इमारत प्रकरणाचा संबंध येत आहे. या प्रकरणात अपील करण्यात आले होते, परंतु या अपिलाचा अजून निकाल लागलेला नाही. तो काय लागतो ते पाहून नंतर काय करावयाचे यासंबंधी आपण अवश्य विचार करू.

## पाठ ७

**पुढील तक्त्यांचे मनन करा :**




**अंतर-दंड**

आता डाव्या तर्जनीने 'ह' ची कळ दावा. मग तर्जनी वर उचलून '३' ची कळ दावा. पुन्हा 'ह' ची कळ दाबा. याचप्रकारे '४' हा अंक टंकलिखित करण्याचा सराव करा.

यानंतर उजव्या तर्जनीने कान्याची कळ दाबा. मग तर्जनी वर उचलून '५' ची कळ दावा. पुन्हा कान्याची कळ दावा. याचप्रकारे '६' हा अंक टंकलिखित करण्याचा सराव करा. वरील कळांचा सराव करताना तोंडाने संबंधित अंकाचा उच्चार करा. कळफलकाकडे मुळीच पाहू नका.

### अभ्यास ११

**पुढील अंक कळफलकाकडे न पाहता किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

३४, ४५, ५६, ६३, ३५, ४६, ५३, ३६, ४३, ५४, ६५, ४४, ३३, ६४, ३६५, ३५४, ६४५, ५६३, ६३४, ३६६, ४६३.

### अभ्यास १२

**पुढील परिच्छेद कळफलकाकडे न पाहता किमान पाच वेळा टंकलिखित करा :**

या गावाची एकंदर लोकसंख्या ६५४३५ इतकी आहे. यामधील ५३४६ लोक शेतीचा धंदा करतात. गावात ३४ लहान लहान कारखाने आहेत. यामध्ये एकंदर ६३५४ लोक काम करतात. या निवेदनातील पान ५६ वर ही माहिती दिली आहे. गावातील शेतकरी लोकांना आणखी सुमारे ६३४ विजेचे पंप पाहिजेत. सध्या ५६४ विहिरींवर हे पंप बसविले आहेत.

## पाठ ८

पुढील तक्त्याचे मनन करा :



### अंतर-दंड

आता डाव्या हाताच्या मधल्या बोटाने '२', अनामिकेने '१' आणि करंगळीने ' ' व '.' (नुक्ता) टंकलिखित करण्याचा सराव करा.

तसेच उजव्या हाताच्या मधल्या बोटाने '७', अनामिकेने '८' आणि करंगळीने '९' व '०' हे अंक टंकलिखित करण्याचा सराव करा.

यानंतर पुढील ओळी किमान एक पृष्ठभर टंकलिखित करा. हे करीत असताना संबंधित अंकाच्या वा चिन्हाच्या नावाचा तोंडाने उच्चार करा. कळफलकाकडे पाहू नका :




### अभ्यास १३

**पुढील अंक व शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान पाच वेळा टंकलिखित करा :**

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १२ | ७८ | ९० | १७ | १० | १९ | १८ |
| ७९ | ७० | ८९ | ८० | ७५ | ९१ | ८२ |
| ७३ | ९८ | ८७ | ७१ | ८१ | ७२ | ९२ |
| ९६२ | १६९ | ४२१ | ५९८ | ६७२ | ३१९ | ८४७ |
| ९०१ | ८०२ | ७०३ | १०२ | २०१ | २१० | ३०४ |

कृपा, नृप, तृण, गृह, वृक, कृपण, मृदुल, हृदय, सृजन, धृपद, मृणाल, मृण्मय, हृद्रोग, मृणालिनी, तृणांकुर, वृकोदर, कृपावंत.

## अभ्यास १४

**पुढील परिच्छेद कळफलकाकडे न पाहता किमान पाच वेळा टंकलिखित करा :**

ही मागणी ५ लाख ९७ हजारांची होती. आता आणखी १ लाख ४३ हजारांची मागणी करण्यात येत आहे. सन १९८५ मध्ये एकंदर रोगी ३२७९८ होते. आता ही संख्या ४७१६५ इतकी आहे. आपली लोकसंख्या आता सुमारे १३२६४७५ नी अधिक आहे. अतएव ही मागणी अपुरी आहे. तरी सरकारने कृपया याचा विचार करावा अशी नम्र विनंती आहे.

## पाठ ९

**पुढील तक्त्याचे मनन करा :**

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | ० |
| | | म | त | ज | ल | न | प | व | च | ऱु | , |
| ा | ै | व क | ॅ ि | ळ ह | ी | श्र र | ज्ञ ा | रु स | ट य | ठ ऱ | द्य . |
| कळबदल | | ग | ब | अ | इ | द | उ | ए | ण | ङ | कळबदल |

### अंतर-दुंड

उजव्या करंगळीने उजवी कळबदल कळ दाबा व नंतर डाव्या हाताच्या करंगळीने 'ा' व 'ै', अनामिकेने 'व', मधल्या बोटाने 'ॅ' आणि तर्जनीने 'ळ' व 'ी' यांच्या कळा दाबून सर्व बोटे पुन्हा पूर्वस्थितीवर आणा.

यानंतर डाव्या करंगळीने डावी कळबदल कळ दाबा व नंतर उजव्या करंगळीने 'द्य' व 'ठ', अनामिकेने 'ट', मधल्या बोटाने 'रु' आणि तर्जनीने 'ज्ञ' व 'श्र' च्या कळा दाबून सर्व बोटे पुन्हा पूर्वस्थितीवर आणा.

आता पुढील ओळी किमान पृष्ठभर टंकलिखित करा. हे करताना संबंधित अक्षराच्या वा चिन्हाच्या नावाचा तोंडाने उच्चार करा. कळफलकाकडे मुळीच पाहावयाचे नाही हे लक्षात ठेवा :

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ा (काना) | ै ('ऐ' मात्रा) | व | ॅ | ळ | ी | ----- डावा हात |
| श्र | ज्ञ | रु | ट | ठ | द्य | ----- उजवा हात |

## अभ्यास १५

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

विद्या, विद्यमान, पद्य, गद्य, श्रियाळ, कैक, कौल, सैल, मैल, तैल, पैसा, बैल, दैना, चौकोन, वाक्य, धक्का, बुक्का, शक्य, तक्क्या, पक्का, चक्का, चालुक्य, खाक्या, रथ, संथ, तथ्य, नथ, जथा, येथे, काथ्या, थयथय, सारथी, यथाशक्य, यथावकाश, शैशव, कळ, काळ, केळ, मळ, मळा, शाळा, तळे, ळळा, नळ, वळ, चळ, गळ, गळा, पळ, पळा, वळण, दळण, उखळी, भर, भूक, सभ्य, भ्रम, भूत, भजन, भले, जीभ, दंभ, उभा, गंभीर, बभ्रा, अभ्यास, इभ्रत, भरभर, श्री, श्रेय, अश्राप, श्रीयुत, श्रीमती, आश्रय, श्रावण, विश्रांती, अज्ञ, यज्ञ, सूज्ञ, तज्ञ, आज्ञा, प्रज्ञा, अज्ञानी, विज्ञान, कृतज्ञ, सज्ञान, स्वेद, स्वीकार, स्वामी, हास्य, भास्कर, मस्करी, रहस्य, लस्सी, आलस्य, दास्य, तस्कर, अय्या, भय्या, शय्या, जय्यत, शेष, विषय, विशेष, दुष्मन, शेषशायी, पुष्करिणी.

## अभ्यास १६

**पुढील परिच्छेद कळफलकाकडे न पाहता किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

येथील एक सभ्य गृहस्थ श्री. भास्कर खळे हे या विषयावर बराच वेळ बोलले आहेत. मी ते सगळे भाषण अगदी शांतपणे ऐकले. मीसुद्धा याच विषयावर बोलण्याकरिता उभा राहिलो आहे. श्री. खळे यांनी सांगितले की, येथील विद्यमान कारभार सरळ नाही. येथे खूप शिथिलता आहे. सगळा-सावळागोंधळ आहे. कारभाराकरिताच पुष्कळ पैसा द्यावा लागतो. पण आमचे मतैक्य होणे शक्य नाही. श्री. खळे यांनी सांगितले की, एका भागात विज्ञान भवन ही इमारत आहे, पण तेथे साधनसामग्री नाही. तर इतर भागात साधनसामग्री आहे, परंतु इमारत नाही. पण हे भाष्य बरोबर नाही. येथे काही तरी चूक होत आहे. कारण साधनसामग्रीकरिता पैसा मंजूर करताना अगोदर इमारत आहे की, नाही हे पाहिले जाते. एक काळ असा होता की, इमारती कमी दिसत, पण काम पुष्कळ होत असे. पण सध्या निराळेच दृश्य दिसत आहे.

पुढील तक्त्याचे मनन करा :



## अंतर-दंड

उजव्या हाताच्या करंगळीने उजवी कळबदलाची कळ दाबा व नंतर डाव्या करंगळीने 'फ' व 'ॅ' च्या कळा, अनामिकेने 'ऱ', मधल्या बोटाने 'ट' व तर्जनीने 'ज' व 'ल' च्या कळा दाबून बोटे पुन्हा पूर्वस्थितीवर आणा.

यानंतर डाव्या करंगळीने डावी कळबदलाची कळ दाबा व नंतर उजव्या करंगळीने 'द्व' व 'क्ष', अनामिकेने 'च', मधल्या बोटाने 'ठ' व तर्जनीने 'ट' व 'न' च्या कळा दाबून तर्जनी पुन्हा 'ा' च्या कळेवर आणा.

आता पुढील ओळी किमान पृष्ठभर टंकलिखित करा. हे करताना संबंधित अक्षराच्या या चिन्हाच्या नावाचा तोंडाने उच्चार करा. कळफलकाकडे मुळीच पाहावयाचे नाही हे विसरू नका :






Na/576-4

## अभ्यास १७

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

ऊर, मऊ, फल, फार, फाशी, फेस, नफा, तोफ, गोफ, फसगत, फांदी, फरशी, रुपये, ऊस, जाऊ, देऊळ, राऊळ, गॅस, मॅच, कॉंग्रेस, गम्य, साम्य, म्यान, तुम्ही, आम्ही, म्हणजे, म्हणाला, म्हणून, साम्यवाद, त्या, त्याग, सत्ता, सत्व, पत्ता, इयत्ता, बत्ता, भत्ता, व्रात्य, महत्त्व, इत्यादी, प्रयत्न, नीतिमत्ता, ज्या, राज्य, त्याज्य, ज्वर, सज्जा, लज्जा, मज्जाव, अल्प, सल्ला, शल्य, पल्ला, वल्हे, स्वल्प, उल्लू, वल्गना, कन्या, धन्य, सैन्य, मन्या, अन्न, मान्य, धान्य, वन्य, न्याय, अन्य, पदन्यास, दैन्यावस्था, स्वप्न, कप्पा, खप्पा, वाप्पा, प्यादे, अप्पा, गप्पासप्पा, काव्य, हव्य, अव्वल, भव्य, व्याधी, व्यापारी, अव्यय, एकलव्य, व्यायाम, उच्च, कच्चा, खच्ची, सच्चा, प्राच्य, लुच्चा, उच्चार, च्यवनप्राश, कक्ष, दक्ष, यक्ष, रक्षा, साक्ष, लक्ष्य, नक्षा, भक्ष्य, पक्ष, क्षमा, क्षेम, रक्षण, तक्षक, वक्षीरा, परीक्षा, क्षालन, द्वार, विद्वान, द्विधा.

## अभ्यास १८

**पुढील परिच्छेद कळफलकाकडे न पाहता किमान पाच वेळा टंकलिखित करा :**

या मागणीचा संबंध राज्य कामगार विमा योजनेशी आहे. परंतु वेळ फारच कमी असल्यामुळे मी फक्त या राज्यातील आमच्या भागापुरते बोलणार आहे. मला आपला फारसा वेळ नको, मी अगदी अल्प वेळ बोलणार आहे. कारण अन्य वेळी या विषयाच्या तपशिलात मी जाऊ शकलो हे मला माहीत आहे. म्हणून सध्याच मी त्या तपशिलात जात नाही. विरोधी पक्षाच्या नेत्यांनीसुद्धा या विषयावर भाषण केले. मी त्यांचे भाषण लक्ष देऊन ऐकले आहे. एखादा कायदा अत्यंत चांगला असूनदेखील त्याचा प्रत्यक्ष वापर चांगल्या रीतीने होत नाही याचे उदाहरण म्हणजे राज्य कामगार विमा योजना हे आहे असे विरोधी पक्षाचे विद्वान नेते म्हणाले. परंतु त्यांच्या म्हणण्यात कसे तथ्य नाही हेच मी दाखवून देणार आहे.

---

## पाठ ११

**पुढील तक्त्याचे मनन करा :**

**अंतर-द्वंद्व**

उजव्या करंगळीने उजवी कळबदल कळ दाबा व नंतर डाव्या करंगळीने 'र्' अनामिकेने 'र', मधल्या बोटाने 'ढ' व तर्जनीने 'ट' आणि 'ठ' च्या कळा दाबून बोटे पुन्हा पूर्वस्थितीवर आणा.

यानंतर डाव्या करंगळीने डावी कळबदल कळ दाबा व नंतर उजव्या करंगळीने 'द', अनामिकेने 'ङ', मधल्या बोटाने 'ढ' व तर्जनीने 'ड' आणि 'छ' च्या कळा दाबून बोटे पुन्हा पूर्वस्थितीवर आणा.

आता पुढील ओळी किमान पृष्ठभर टंकलिखित करा. हे करताना संबंधित अक्षराच्या वा चिन्हाच्या नावाचा तोंडाने उच्चार करा. कळफलकाकडे पाहू नका :

(रफार) ------ **डावा हात**

छ ड ढ ङ द ----- **उजवा हात**

## अभ्यास १९

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

अर्क, चर्या, आर्त, जाई, ईद, माई, अर्घ्य, स्वर्ग, अर्पण, अर्नाळा, अर्भक, अर्ज, होईल, नेईन, जाईन, बग्या, भाग्य, लग्गा, टग्या, युग्म, अग्नी, अब्ज, शब्द, अब्द, बाब्या, तब्येत, टप, पाट, गट, खट, बट, अट, धीट, दाट, ताट, जाट, लाट, टाक, टाप, मटकी, चटणी, चटकन, ठग, काठ, पाठ, गाट, माट, गाठ, साट, ठाम, ताठ, जठर, उठाव, नाठाळ, छान, छेड, कच्छ, स्वच्छ, छद, धागा, अच्छा, मच्छर, छोकरा, कड, तड, गड, आड, हाड, जड, लाड, वड, पड, धड, डाग, चाड, डाम, छडी, डमरू, लडक, पडाव, बडबड, ढब, कढी, ढीग, गढी, ढास, लढा, अढे, ढंग, ओढ, चढण, ढगाळ, झरा, माझा, तुझी, झळ, माझ्या, तुझ्या, ओझे, झगा, झुंबर, झटकन, घर, घन, घड, घाम, ओघ, घात, घाण, बाध, बघ, उघड, माघार, उपलब्ध, पूजाअर्चा, अर्वाचीन, आग्यावेताळ.

## अभ्यास २०

**पुढील परिच्छेद कळफलकाकडे न पाहता किमान पाच वेळा टंकलिखित करा :**

लांब धाग्याच्या कापसाचे जास्त उत्पादन काढण्याची जी योजना आता आखण्यात आली आहे तिच्याबद्दल मला चार शब्द बोलावयाचे आहेत. माझ्या मते ही योजना अत्यंत उपयुक्त अशी आहे. आता फक्त साठ एकरांत या लांब धाग्याच्या कापसाची पेरणी करण्यात येईल. परंतु साठच एकर का निवडले याचा खुलासा झाला तर मी सरकारचा उतराई होईन. माझ्या मते आणखी जास्त जमीन या लांब धाग्याच्या कापसाच्या लागवडीसाठी घ्यावयास पाहिजे होती. अर्थात अजीबात नाही त्यापेक्षा थोडी तरी जमीन घ्यावयाची आहे हे छानच आहे, परंतु पुढच्या वर्षी तरी यासाठी जास्त जमीन घ्यावी अशी माझी सूचना आहे. शेतकरी लोकांना यासाठी काही कर्ज मिळणार आहे, पण त्यासाठी कोणत्या अटी घालण्यात येणार आहेत हे समजले तर फार बरे होईल.

पुढील तक्त्याचे मनन करा :

## अंतर-वृंद

उजव्या करंगळीने उजवी कळबदल कळ दाबा. नंतर डाव्या करंगळीने "ˆ" ('ट्र' मधील 'र' चे अथवा काकपदाचे चिन्ह) व '्' (हलन्त चिन्ह), अनामिकेने '×', (फुली), मधल्या बोटाने '/' (तिरकी रेघ), तर्जनीने ':' (विसर्गाचे चिन्ह) आणि '=' (समान चिन्ह) यांच्या कळा दाबून बोटे पुन्हा पूर्वस्थितीवर आणा. यानंतर डाव्या करंगळीने डावी कळबदल कळ दाबा. नंतर उजव्या करंगळीने 'ॠ' व 'ृ', अनामिकेने ']' (उजवा कंस), मधल्या बोटाने '[' (डावा कंस) आणि तर्जनीने '''' (दुहेरी अवतरण चिन्ह) व '–' (संयोग चिन्ह) यांच्या कळा दाबून बोटे पुन्हा पूर्वस्थितीवर आणा.

[illegible] पुढील ओळी किमान पृष्ठभर टंकलिखित करा. हे करताना संबंधित अक्षराच्या [illegible] तोंडाने उच्चार करा. कळफलकाकडे पाहू नका :

(काकपद) (हलन्त) (फुली) (तिरकी) (विसर्ग) (समान चिन्ह) ------ डावा हात

(संयोग चिन्ह) (अवतरण चिन्ह) (डावा कंस) (उजवा कंस) ------ उजवा हात

## अभ्यास २१

**पुढील शब्द कळफलकाकडे न पाहता प्रत्येकी किमान दहा वेळा टंकलिखित करा :**

राष्ट्र, ट्रक, ट्राम, राष्ट्रीय, राष्ट्रपती, महाराष्ट्र, अतः, पुनः, मूलतः, विशेषतः, परिणामतः.

(२/३), (४५/६५-अ), ६७/८९-ब.

*(अ-ब), 'अ-क', 'आणि/किंवा'

कुत्रा, रात्र, सत्र, पद्म, बद्दल, रद्द,

जत्रा, पत्र, खात्री, ऋषी, मंत्र, मंत्री, मंत्रालय कात्रण.

३×४=१२, २×९=१८, १३×२=२६, १५×७=१०५, २०×६=१२०

## अभ्यास २२

**पुढील प्रत्येक ओळ कळफलकाकडे न पाहता किमान तीन वेळा टंकलिखित करा :**

| | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | क | का | कि | की | कु | कू | के | कै | को | कौ | कं | कः |
| (२) | ख | खा | खि | खी | खु | खू | खे | खै | खो | खौ | खं | खः |
| (३) | ग | गा | गि | गी | गु | गू | गे | गै | गो | गौ | गं | गः |
| (४) | घ | घा | घि | घी | घु | घू | घे | घै | घो | घौ | घं | घः |
| (५) | च | चा | चि | ची | चु | चू | चे | चै | चो | चौ | चं | चः |
| (६) | छ | छा | छि | छी | छु | छू | छे | छै | छो | छौ | छं | छः |
| (७) | ज | जा | जि | जी | जु | जू | जे | जै | जो | जौ | जं | जः |
| (८) | झ | झा | झि | झी | झु | झू | झे | झै | झो | झौ | झं | झः |
| (९) | ट | टा | टि | टी | टु | टू | टे | टै | टो | टौ | टं | टः |
| (१०) | ठ | ठा | ठि | ठी | ठु | ठू | ठे | ठै | ठो | ठौ | ठं | ठः |
| (११) | ड | डा | डि | डी | डु | डू | डे | डै | डो | डौ | डं | डः |
| (१२) | ढ | ढा | ढि | ढी | ढु | ढू | ढे | ढै | ढो | ढौ | ढं | ढः |
| (१३) | ण | णा | णि | णी | णु | णू | णे | णै | णो | णौ | णं | णः |
| (१४) | त | ता | ति | ती | तु | तू | ते | तै | तो | तौ | तं | तः |
| (१५) | थ | था | थि | थी | थु | थू | थे | थै | थो | थौ | थं | थः |
| (१६) | द | दा | दि | दी | दु | दू | दे | दै | दो | दौ | दं | दः |
| (१७) | ध | धा | धि | धी | धु | धू | धे | धै | धो | धौ | धं | धः |
| (१८) | न | ना | नि | नी | नु | नू | ने | नै | नो | नौ | नं | नः |
| (१९) | प | पा | पि | पी | पु | पू | पे | पै | पो | पौ | पं | पः |
| (२०) | फ | फा | फि | फी | फु | फू | फे | फै | फो | फौ | फं | फः |
| (२१) | ब | बा | बि | बी | बु | बू | बे | बै | बो | बौ | बं | बः |

| | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (२२) | भ | भा | भि | भी | भु | भू | भे | भै | भो | भौ | भं | भः |
| (२३) | म | मा | मि | मी | मु | मू | मे | मै | मो | मौ | मं | मः |
| (२४) | य | या | यि | यी | यु | यू | ये | यै | यो | यौ | यं | यः |
| (२५) | र | रा | रि | री | रु | रू | रे | रै | रो | रौ | रं | रः |
| (२६) | ल | ला | लि | ली | लु | लू | ले | लै | लो | लौ | लं | लः |
| (२७) | व | वा | वि | वी | वु | वू | वे | वै | वो | वौ | वं | वः |
| (२८) | श | शा | शि | शी | शु | शू | शे | शै | शो | शौ | शं | शः |
| (२९) | ष | षा | षि | षी | षु | षू | षे | षै | षो | षौ | षं | षः |
| (३०) | स | सा | सि | सी | सु | सू | से | सै | सो | सौ | सं | सः |
| (३१) | ह | हा | हि | ही | हु | हू | हे | है | हो | हौ | हं | हः |
| (३२) | ळ | ळा | ळि | ळी | ळु | ळू | ळे | ळै | ळो | ळौ | ळं | ळः |
| (३३) | क्ष | क्षा | क्षि | क्षी | क्षु | क्षू | क्षे | क्षै | क्षो | क्षौ | क्षं | क्षः |
| (३४) | ज्ञ | ज्ञा | ज्ञि | ज्ञी | ज्ञु | ज्ञू | ज्ञे | ज्ञै | ज्ञो | ज्ञौ | ज्ञं | ज्ञः |

## अभ्यास २३

**पुढील परिच्छेद कळफलकाकडे न पाहता किमान पाच वेळा टंकलिखित करा :**

अध्यक्ष महाराज, आता ''दवाखाने'' या सदराखाली २.१/२ लाख रुपयांची मागणी करण्यात आली आहे. यात ''मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा जास्त होणारा खर्च भागविण्याकरिता जादा अनुदान'' अशी एक बाब आहे. ही जादा रक्कम का लागली याचे स्पष्टीकरण करताना असे म्हटले आहे की:-

> ''महाराष्ट्र सरकारने पुरविलेल्या सुखसोयी व आरोग्याबाबतच्या उपाय-योजनांची वाढती जाणीव यामुळे सर्व रोग्यांच्या (आंतररुग्ण व बहिर्रुग्णांच्या) संख्येत वाढ झाली आहे.''

या बाबतीत मी प्रस्ताव क्रमांक ३५६/४०२/अ-२, दिनांक २-१-१९६४ कडे आपले लक्ष वेधतो. या प्रस्तावान्वये विशेषतः आयुर्वेदाला उत्तेजन देण्याचे ठरले होते. नामदार मंत्र्यांना हा प्रस्ताव माहीतच आहे. शिवाय सन्माननीय सभासद श्री. अत्रे हे त्याबद्दल आताच बोलले आहेत. ऋषि-मुनींच्या संशोधनातून आयुर्वेद जन्माला आला. त्याला उत्तेजन देण्यासाठी पूर्वीचेच मार्ग न स्वीकारता नवीन मार्ग पुनः पुन्हा शोधण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**येथवर कळफलकाचा अभ्यास पूर्ण झाला. आता अधिक सरावासाठी निरनिराळ्या नमुन्यांचे अधिक अभ्यास पुढे दिले आहेत.**

अभ्यास २४

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

श्री. ......................... हे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या तारीख ........................ रोजी होणाऱ्या चिखलठाणा येथील नवीन औद्योगिक क्षेत्राच्या उद्घाटन समारंभाच्या निमंत्रणाबद्दल आभारी आहेत.

इतर कार्यामुळे वरील समारंभास त्यांना उपस्थित राहता येणार नाही याबद्दल ते दिलगीर आहेत.

२ जून १९९२.
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई ४०० ०३२.

---

(वरील निमंत्रण स्वीकारावयाचे असते तर दुसऱ्या परिच्छेदाबद्दल "वरील समारंभास उपस्थित राहण्यास त्यांना आनंद वाटेल" हे वाक्य घातले असते. तेव्हा एकदा तसेही टंकलिखित करा.)

अभ्यास २५

खालील मजकूर टंकलिखित करा :

महाराष्ट्र शासन
प्रसिद्धी संचालक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
प्रसिद्धी पत्रक

पी-३८०

. . . . . . . . . . . . . . .

चैत्र ११, १९०३ / एप्रिल १, १९८६ दुपारी १ वाजता

महाराष्ट्रातील जिल्हा सैनिक, नाविक व वैमानिक मंडळांना राज्य शासनाची कार्यालये म्हणून घोषित करणे.

मुंबई, पुणे, सातारा, सांगली, अलिबाग, रत्नागिरी, कोल्हापूर, नागपूर, अहमदनगर, जळगाव, नागपूर, औरंगाबाद, अकोला, धुळे, नाशिक, बुलढाणा, अमरावती आणि यवतमाळ येथे कार्य करीत असलेली महाराष्ट्रातील सध्याची १८ जिल्हा सैनिक, नाविक व वैमानिक मंडळे ही राज्य शासनाची स्थायी कार्यालये असल्याचे आणि त्यांचे कर्मचारी हे राज्य शासनाचे कर्मचारी असल्याचे शासनाने घोषित केले आहे. सचिवांव्यतिरिक्त, मंडळाच्या इतर कर्मचारीवर्गास मात्र, त्यांना सध्या अनुज्ञेय असलेल्या दरानेच वेतन व भत्ते मिळत राहतील. सचिवांच्या बाबतीत, सुधारलेल्या वेतनश्रेणी निश्चित करण्यात आलेल्या आहेत व त्यानुसार त्यांना वेतन मिळेल. त्यांच्याच दर्जाच्या राज्य शासनाच्या कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दरानेच त्यांना महागाई भत्ता व इतर भत्ते मिळतील. प्रथम श्रेणीच्या कक्षेत येणाऱ्या सचिवांना, द्वितीय श्रेणीच्या दर्जाचे राजपत्रित अधिकारी म्हणून समजण्यात येईल.

## अभ्यास २६

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

क्रमांक ..............................................
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक ..............................................

विषय.—लिपिकाच्या पदासाठी निवड.

ज्ञापन

श्री. / कुमारी / श्रीमती................................यांना कळविण्यात येते की, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सल्ल्याने, मंत्रालयीन दुय्यम सेवेत / बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात, लिपिकाच्या पदासाठी त्यांची निवड करण्यात आली असून, या विभागाने ठेवलेल्या निवड सूचीत त्यांचे नाव दाखल करण्यात आले आहे.

२. त्यांना असेही कळविण्यात येत आहे की, ................., मुंबई यांच्या कार्यालयात लिपिकाची एक तात्पुरती जागा भरावयाचची आहे. म्हणून त्यांनी..............................., मुंबई, यांच्याकडे कामावर रुजू व्हावे. त्यांना आपला प्रवास खर्च स्वत: करावा लागेल.

३. त्यांना आणखी असेही कळविण्यात येत आहे की, हे ज्ञापन काढल्याच्या तारखेपासून सात दिवसांच्या आत ते / त्या कामावर रुजू झाले / झाल्या नाहीत तर त्यांचे नाव कोणतीही सूचना न देता ह्या विभागाने ठेवलेल्या निवड सूचीतून काढून टाकण्यात येईल.

अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.



## अभ्यास २७

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

क्रमांक .....................
कृषि विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक .....................

श्री......................

........................

........................

यांस

विषय.—शेती योजनांची माहिती.

संदर्भ.—आपले दिनांक ........ चे पत्र.

महोदय,

आपले वरील तारखेचे पत्र मिळाले. महाराष्ट्र शासनाने शेती सुधारणेकरिता अनेक योजना सुरू केलेल्या आहेत. त्यांची तपशीलवार माहिती सोबत जोडलेल्या परिपत्रकावरून मिळेल. जिल्हा पातळीवर या योजना जिल्हा परिषदेकडून कार्यान्वित केल्या जातात. परिषदेच्या कृषि विभागाच्या अधिकाऱ्यांना आपणास, आवश्यक वाटेल ती माहिती पुरवावी असा आदेश विभागीय महसूल आयुक्त यांच्या मार्फत देण्यात येत आहे. यासंबंधी पुन्हा काही अडचणी निर्माण झाल्यास आपण कृषि संचालक, पुणे-१, यांस लिहावे.

आपला,

उप सचिव,
कृषि विभाग.

## अभ्यास २८

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

. . . . . . . . . . . .
उप सचिव,
महाराष्ट्र शासन.

अर्ध-शासकीय पत्र क्र. . . . . . . . .
ग्रामविकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक . . . . . . . . . . . . . . .

प्रिय श्री. . . . . . . . . . . . . . . . .,

कृपया महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती नियमावलीचा मराठीत अनुवाद करण्यासंबंधीचे आपले दिनांक . . . . . . . . . . . ., क्रमांक . . . . . . . . . . . . . .चे पत्र पाहावे.

आपण निवेदन केलेली परिस्थिती विचारात घेता, सदरहू नियमावलीचा अनुवाद उशिरात उशिरा म्हणजे दि. . . . . . . . . . . . . . . . पर्यंत या विभागाकडे पाठविण्याची व्यवस्था करावी. हे नियमावलीचे पुस्तक शक्य तितक्या लवकर मराठीत प्रसिद्ध व्हावे अशी शासनाची तीव्र इच्छा आहे हे मी आपल्या निदर्शनास आणू इच्छितो. या नियमावलीच्या इंग्रजी आवृत्तीचे मुद्रण करण्यात येत असून . . . . . . . . . च्या अखेरीस त्याच्या प्रती वितरणासाठी तयार होतील अशी अपेक्षा आहे. वस्तुतः मराठी पुस्तकास मोठ्या प्रमाणात मागणी असल्यामुळे ही आवृत्ती अगोदरच प्रसिद्ध करणे अधिक योग्य झाले असते. परंतु ते शक्य नसल्यामुळे ती आवृत्ती इंग्रजीनंतर तावडतोब निघावी, अशी अपेक्षा केल्यास वावगे होणार नाही.

म्हणून, आपण परत पाठविलेले साहित्य पुन्हा स्वीकारावे आणि शक्य तितक्या लवकर त्याचा अनुवाद करण्यासंबंधी व्यवस्था करावी, अशी मी आपणांस पुन्हा विनंती करीत आहे. . . . . . . .च्या अखेरीपर्यंत अनुवादित साहित्य आपणाकडून मिळेल अशी अपेक्षा आहे.

अनुवादाचे साहित्य मी पुन्हा परत पाठवीत आहे.

आपला स्नेहांकित,

श्री. . . . . . . . . . . . . .,
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य,
**मुंबई.**

अभ्यास २९

पुढील मजकूर टंकलिखित करा :

क्रमांक . . . . . . . . . . . . . . . .
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक . . . . . . . . . . . . . . . .

विषय.—ग्रामीण ध्वनिक्षेपण उप विभाग.
विभागाद्वारे सामूहिक रेडिओ तयार करणे.

ज्ञापन :

अभियंता, ग्रामीण ध्वनिक्षेपण उप विभाग, मुंबई, यांना शासन निर्णय क्र. . . . . . . . . . . ., दिनांक . . . . . . . . . . . . . . . . . . च्या संदर्भात असे कळविण्याचा मला आदेश आहे की, विधानसभेने मान्यता दिलेली आणि शासकीय पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र. . . . . . . यानुसार त्याजकडे सोपविलेली रु. . . . . . . . . ची पूरक मागणीची रक्कम, ही शासकीय ज्ञापन, वित्त विभाग, क्र. . . . . . . . . यानुसार आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेल्या आगाऊ रकमेची भरपाई करण्यासाठी व चालू वर्षाच्या राहिलेल्या कालावधीतील खर्चाची तरतूद करण्यासाठी दिलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.

प्रभारी अभियंता,
ग्रामीण ध्वनिक्षेपण उप विभाग,
इरॉस चित्रपटगृहाची इमारत,
मुंबई ४०० ००१,

यांस

माहितीसाठी प्रत रवाना—

महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग.

अभ्यास ३०

पुढील मजकूर टंकलिखित करा :

श्री. .................. यांना

दक्षतारोध पार करण्यास परवानगी देणे.

महाराष्ट्र शासन

शिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांक ........

मंत्रालय, मुंबई, दिनांक ........

शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांचे पत्र क्रमांक ........, दिनांक ...... पाहावे.

शासन निर्णय : श्री. ........, मुख्याध्यापक, मुलांची सरकारी उच्च माध्यमिक शाळा, जिल्हा ........, यांना दि........ पासून महाराष्ट्र शिक्षण सेवा वर्ग २, सुधारित वेतनमान रु. २५०–२७०–१५–३९०–रोध–१५–४५०–२०–४९०–रोध–२५–७१५ या वेतनमानात रु. ३९०/- वर दक्षतारोध पार करण्याची व उपरोक्त तारखेपासून त्या वेतनमानात द. म. रु. ४०५/- वेतन काढण्याची परवानगी देण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव,
महाराष्ट्र शासन.

शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
मुख्याध्यापक, मुलांची सरकारी उच्च माध्यमिक शाळा, ........
वरिष्ठ उप महालेखापाल, नागपूर.
वित्त विभाग.

यांस

अभ्यास ३१

पुढील मजकूर टंकलिखित करा :

क्र. . . . . . . . . . . . . . .

महसूल विभाग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक . . . . . . . . . . . .

श्री. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . ,

मु. . . . . . . . . . . . , तालुका . . . . . . . . . . . . ,

जिल्हा . . . . . . . . . . . . . . . . यांस

विषय.—धारण जमिनींच्या एकत्रीकरणाची योजना.

. . . . . . . . . जिल्ह्याच्या . . . . . तालुक्यातील . . . . . . गावाबाबत.

महोदय,

वरील विषयासंबंधी दिनांक . . . . . . . . . . . . . . . . . चा आपला अर्ज आणि दिनांक . . . . . . . . . . व दिनांक . . . . . . . . . ला पाठविलेल्या तारा यांच्या संदर्भात आपणास असे कळविण्याचा मला आदेश आहे की, फेरफार केलेली योजना शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यास जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, यांना यापूर्वीच सांगण्यात आलेले आहे. फेरफार केलेली योजना तयार करून शासनाकडून ती मंजूर करण्यात येईपर्यंत, भूमापन क्रमांक . . . . . . . . . किंवा . . . . . . . . . मध्ये पेरणी करण्यासाठी परवानगी देण्यासंबंधीची आपली विनंती मान्य करता येत नाही.

आपला,

सहायक सचिव, महाराष्ट्र शासन,

महसूल विभाग.

क्र. . . . . . . . . . . . . . . .

महसूल विभाग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक . . . . . . . . . . . .

जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, यांना त्यांचे पत्र क्रमांक . . . . . . , दिनांक . . . . . . . . च्या संदर्भात या पत्राची प्रत पाठविण्यात येत आहे.

२. जमाबंदी आयुक्तांनी फेरफार केलेली योजना शासनाच्या मान्यतेसाठी त्वरित सादर करावी, अशी त्यांना विनंती आहे.

सहायक सचिव, महाराष्ट्र शासन,

महसूल विभाग.

अभ्यास ३२

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

क्रमांक ..............
शिक्षण विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक ..............

विषय.— मुख्याध्यापकाच्या पदाचा अतिरिक्त कार्यभार धारण करणे.

ज्ञापन :

शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांस, वर उल्लेखिलेल्या विषयावरील त्यांच्या पत्र क्रमांक ..... .., दिनांक ........ च्या संदर्भात असे कळविण्याचा मला आदेश आहे की, श्री. .................... यांनी दिनांक .............. पासून दिनांक ........ पर्यंतच्या (दोन्ही दिवस धरून) कालावधीत सहायक अध्यापक म्हणून आपली स्वतःची कर्तव्ये सांभाळून मुख्याध्यापकाच्या पदाचा अतिरिक्त कार्यभार धारण केल्याबद्दल त्यांना मुख्याध्यापकाच्या पदाच्या आनुमानिक वेतनाच्या १/१० इतके विशेष वेतन देण्यास (शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक ........, दिनांक ...... अनुसार मंत्रालयीन प्रशासनिक विभागांना प्रदान केलेल्या शक्तीअन्वये) शासनाने मंजुरी दिली आहे.

२. या प्रस्तावात अंतर्भूत असलेला खर्च "१९, सामान्य प्रशासन–नागरी सचिवालय" या शीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व त्याखाली केलेल्या तरतुदीतून तो भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव,
महाराष्ट्र शासन,
शिक्षण विभाग.

शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

**यांस.**

**वित्त विभागास प्रत रवाना.**

अभ्यास ३३

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

क्रमांक . . . . . . . . . . . . .
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक . . . . . . . . . . . . .

आदेश

मुंबई सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी नियमांतील नियम १४(१) (अ) (एक) आणि १४ (क) (एक) अन्वये शासनाकडे निहित करण्यात आलेल्या प्राधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र शासन, सामान्य प्रशासन विभागातील चपराशी श्री. . . . . . . . . . . . . . . . . . यांना त्यांच्या पत्नीच्या व मुलांच्या प्रदीर्घ आजारानिमित्त आलेला खर्च भागविण्यासाठी उपरोक्त निधी खाते क्रमांक . . . . . . . . यामध्ये जमा असलेल्या शिल्लक रकमेतून रु. ३००/- (केवळ तीनशे रुपये) आगाऊ रक्कम मंजूर करीत आहे.

आणि असा आदेश देत आहे की, सदरहू आगाऊ रक्कम प्रत्येकी रु. १५/- याप्रमाणे २० समान मासिक हप्त्यांमध्ये वसूल करण्यात यावी. उक्त नियमातील नियम १५ (४) अनुसार उपरोक्त आगाऊ रक्कम काढल्यापासून तिची संपूर्ण परतफेड करण्यात येईपर्यंतच्या कालावधीत, प्रत्येक महिन्यासाठी किंवा त्याच्या खंडित भागासाठी, आगाऊ रकमेच्या एक-पंचमांश टक्क्याइतके व्याज आकारण्यात येईल. ही व्याजाची रक्कम एका हप्त्यात देण्यात आली पाहिजे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव,
महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
(रोख उप शाखेमार्फत)
यांस.

प्रत रवाना :

महालेखापाल, मुंबई,
श्री. . . . . . . . . . . . . . . . ., चपराशी, सामान्य प्रशासन विभाग,
रोख उप शाखा, सामान्य प्रशासन विभाग.
निवड फाईल.

अभ्यास ३४

पुढील मजकूर टंकलिखित करा :

महाराष्ट्र शासन

क्रमांक . . . . . . . . . . . . .
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक . . . . . . . . . . . . .

विषय.—विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन, यांच्याकडून फर्निचरची खरेदी.

ज्ञापन :

विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन, यांच्या वरील विषयासंबंधीच्या पत्र क्रमांक . . . . . . . ., दिनांक . . . . . . . . च्या संदर्भात त्यांना असे कळविण्याचा मला आदेश आहे की, एकूण ७९३०/- रुपये (रुपये सात हजार नऊशे तीस फक्त) अधिक त्यावरील कर इतक्या किमतीचे खालील फर्निचर खरेदी करण्यास शासनाने मंजुरी दिली आहे :

(१) ३ लाकडी टेबले (कप्पे व एक खण असलेली),

(२) २ लाकडी टेबले (दोन खण असलेली),

(३) ६ खुर्च्या (हात असलेल्या),

(४) २ रॅक (लहान).

फर्निचरची खरेदी विहित कार्यपद्धतीनुसार करण्यात यावी.

या कारणाकरिता होणारा खर्च "५०, सरकारी बांधकामे—राज्य आस्थापना (आकस्मिक खर्च) (२) शासनाचे विमानचालन सल्लागार" या शीर्षात खर्च खाती टाकण्यात यावा व चालू वित्तीय वर्षासाठी त्या शीर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून तो भागविण्यात यावा.

हे ज्ञापन, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक . . . . . . . दिनांक . . . . . . . . . . . . . यानुसार त्या विभागाच्या सहमतीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.

अभ्यास ३५

पुढील मजकूर टंकलिखित करा :

सेवायोजन सूचना

भाषा संचालनालय

महाराष्ट्र शासन, मुंबई

भाषा संचालनालयामधील कनिष्ठ अनुवादकांच्या सुमारे २० तात्पुरत्या जागांसाठी खालील अटी आणि शर्तींवर अर्ज मागविण्यात येत आहेत :

कनिष्ठ अनुवादक—सुमारे २० जागा.

वेतनश्रेणी—रु. ३३५–१५–५००–२०–५८०–रोध–२०–६८० अधिक सर्वसाधारण नियमांनुसार सरकारी कर्मचाऱ्यांना मिळणारा महागाई भत्ता.

अर्हता—उमेदवार मान्यताप्राप्त विद्यापीठाचा पदवीधर असला पाहिजे. त्याला इंग्रजी व मराठी या भाषांचे सखोल ज्ञान असले पाहिजे. संस्कृत व हिंदी भाषांचे ज्ञान हे अतिरिक्त अर्हता समजण्यात येईल.

द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण झालेले पदवीधर व द्विपदवीधर यांना अधिक पसंती देण्यात येईल.

वय—. . . . . . . . रोजी उमेदवाराचे वय २५ वर्षांपेक्षा अधिक असता कामा नये. मागास वर्गाच्या उमेदवारांच्या बाबतीत ही वयोमर्यादा ३० वर्षांपर्यंत शिथिल करण्यात येईल. काही अपवादात्मक अर्हता असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत वयाची अट शिथिल करण्यात येईल.

अर्हता, पूर्वानुभव, जन्मतारीख इत्यादींचा संपूर्ण तपशील देणारे अर्ज व पदवी प्रमाणपत्रे, चारित्र्य प्रमाणपत्रे, नास्तिपत्रे इत्यादींच्या राजपत्रित अधिकाऱ्याने किंवा दंडाधिकाऱ्याने यथोचित अधिप्रमाणित केलेल्या प्रती भाषा संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई ४०० ०३२ यांजकडे दिनांक . . . . . . . . . रोजी किंवा तत्पूर्वी पोहोचल्या पाहिजेत.

उमेदवारांना लेखी चाचणी परीक्षेला बसावे लागेल. मुलाखतीसाठी त्यांना स्वखर्चाने उपस्थित राहावे लागेल.

सध्या शासकीय सेवेत असलेल्या उमेदवारांनी आपले अर्ज संबंधित विभाग प्रमुखां-मार्फत पाठविले पाहिजेत.

अभ्यास ३६

पुढील मजकूर टंकलिखित करा :

ना-परतावा आगाऊ रक्कम . . . . . . . . .
भारताबाहेरील उच्च तंत्र शिक्षणाचा खर्च
भागविण्यासाठी श्री. . . . . . . . . . . . . .,
अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग,
यांना मंजूर करणे.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक . . . . . . . .
मंत्रालय, मुंबई, दिनांक . . . . . . . . . . . . . .

शासन निर्णय

श्री. . . . . . . . . . . . . ., अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांना विशेष बाब म्हणून त्यांचा सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी खाते क्रमांक . . . . . . . . . यामधून . . . . . . . . . . . रुपयांची ना-परतावा आगाऊ रक्कम शासन मंजूर करीत आहे. शासन निर्णय, राजनैतिक व सेवा विभाग, क्रमांक . . . . . . . . ., दिनांक . . . . . . . ., यानुसार घालून दिलेल्या अटींना व शर्तींना अधीन राहून ही आगाऊ रक्कम मंजूर करण्यात येत आहे.

२. श्री. . . . . . . . . . . . . . . . . . . हे, उपरोक्त परिच्छेद 1 मध्ये उल्लेख केलेल्या शासकीय आदेशामध्ये दिलेल्या अटी व शर्ती पूर्ण करतात.

३. श्री. . . . . . . . . . . . . . . . यांनी, ही आगाऊ रक्कम घेतल्याच्या तारखेपासून सहा महिन्यांच्या आत, दिलेली आगाऊ रक्कम त्यांनी आपल्या मुलाच्या भारताबाहेरील उच्च तंत्र शिक्षणाकरिता खर्च केली आहे, हे दाखविणारा समाधानकारक पुरावा शासनाकडे सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
कार्यालय लेखापाल, सामान्य प्रशासन विभाग,
श्री. . . . . . . . . . . ., अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग,

यांस.

अभ्यास ३७

पुढील मजकूर टंकलिखित करा :

वेतन—

भारतीय पोलीस सेवेच्या वरिष्ठ
समयश्रेणीतील श्री. . . . . . . . . . . . . . ,
पोलीस उप आयुक्त, मुंबई, यांच्या बाबतीत
ते निश्चित करणे.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक . . . . . . . . .

मंत्रालय, मुंबई, दिनांक . . . . . . . .

पाहा : शासकीय पत्र, गृह विभाग, क्रमांक . . . . . . . . . . ., दिनांक . . . . . . . . . . . .

शासन निर्णय.—शासकीय पत्र, गृह विभाग, क्रमांक . . . . . ., दिनांक . . . . . ., मध्ये दिलेले आदेश रद्द करून शासन असा निदेश देत आहे की, केंद्रीय लोकसेवा आयोगाने निवड केलेल्या राज्य पोलीस सेवेतील अधिकाऱ्याची भारतीय पोलीस सेवेतील संवर्ग पदाशी समान असलेल्या संवर्गेतर पदावर ज्या वेळी नियुक्ती करण्यात येते त्या वेळी त्याचे वेतन ज्या पद्धतीने निश्चित करण्यात येते त्याच पद्धतीने, म्हणजे गृह मंत्रालयाचे पत्र क्रमांक . . . . ., दिनांक . . . . . . . . . . ., च्या भाग २ मधील खंड (सहा) मध्ये नमूद केलेल्या पद्धतीने, श्री. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .,पोलीस उप आयुक्त, बृहन्मुंबई, यांचे वेतन निश्चित करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
गृह विभाग.

पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
पोलीस आयुक्त, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
(शासकीय पत्र, गृह विभाग, क्रमांक : . . . . . . . . ., दिनांक . . . . . . च्या प्रतीसह)
सामान्य प्रशासन विभाग ('च' शाखा).
वित्त विभाग (शाखा चार),

यांस

अभ्यास २८

पुढील मजकूर टंकलिखित करा :

क्रमांक ..........
आयुक्त, मुंबई विभाग, यांचे कार्यालय,
मुंबई क्र. १, दिनांक ...........

सचिव,
महसूल विभाग,
मंत्रालय, मुंबई.

यांस—

विषय.— अपर जिल्हाधिकारी विभागाध्यक्ष म्हणून घोषित करणे.

अपर जिल्हाधिकाऱ्यांच्या प्रवासभत्ता बिलांवर "नियंत्रक अधिकारी" म्हणून कोणी सही करावी, असा प्रश्न उपस्थित झाला आहे. मुंबई नागरी सेवा नियम (खंड दोन) च्या परिशिष्ट बेचाळीसमधील अनुक्रमांक ८१ वरील नोंदीनुसार, विभागाध्यक्ष हे स्वत:च नियंत्रक अधिकारी आहेत. तथापि, मुंबई नागरी सेवा नियम (खंड दोन) च्या परिशिष्ट दोनवरून केवळ "जिल्हाधिकाऱ्यांनाच" "विभागाध्यक्ष" मानल्याचे दिसून येते. त्या सूचीमध्ये "अपर जिल्हाधिकाऱ्यांचा" अंतर्भाव केलेला नाही. मुंबई नागरी सेवा नियम (खंड दोन) च्या परिशिष्ट दोनमध्ये "अपर जिल्हाधिकारी" हा शब्दप्रयोग समाविष्ट केल्याशिवाय, ते नियंत्रक अधिकारी म्हणून बिलावर प्रतिस्वाक्षरी करण्यास सक्षम ठरणार नाहीत. म्हणून "अपर जिल्हाधिकाऱ्यांना" "विभागाध्यक्ष" म्हणून घोषित केल्यास ठीक होईल. त्या दृष्टीने असे सुचविण्यात येते की, मुंबई नागरी सेवा नियम (खंड दोन) च्या परिशिष्ट दोनमधील "जिल्हाधिकारी" या शब्दप्रयोगात "अपर जिल्हाधिकाऱ्यांचा" समावेश आहे असे समजण्यात यावे. त्यामुळे अपर जिल्हाधिकाऱ्यास आपल्या प्रवासभत्ता बिलांवर प्रतिस्वाक्षरी करता येईल. "सचिव" या शब्दात "अपर सचिवांचाही" समावेश होतो असे वाटते. या बाबतीत त्वरित आदेश काढण्याची शासनास विनंती करण्यात यावी.

कार्यालय प्रत आयुक्तांकडून मान्य.

आयुक्त, मुंबई विभाग, यांच्याकरिता.

टिप. .......आणि पपू. ..........

("अपर जिल्हाधिकाऱ्यांना" विभागाध्यक्ष म्हणून घोषित करण्यासंबंधीची महसूल विभागाची फाईल क्र. ........ सोबत प्रस्तुत.)

महसूल विभाग,
मंत्रालय, मुंबई.

उपरोक्त आदेशाप्रमाणे सामान्य प्रशासन विभागाकडे हस्तांतरित.

(आद्याक्षरी) अधीक्षक, 'ड' शाखा, महसूल विभाग.

[illegible]

पुढील मजकूर टंकलिखित करा :

चंद्रपूर जिल्ह्यातील राज्य महामार्गाच्या आलापल्ली–सिरोंचा रस्त्यावरील मैल क्रमांक ११२–१ या ठिकाणी असलेल्या नाल्यावर पूल बांधणे— तृतीय पंचवार्षिक योजनांतर्गत बांधकाम.

महाराष्ट्र शासन
इमारती व दळणवळण विभाग
शासन निर्णय क्रमांक ............
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ................

अधीक्षक अभियंता (इमारती व दळणवळण) मंडळ, नागपूर, यांच्याकडून आलेले पत्र क्रमांक ........, दिनांक ........

आलापल्ली–सिरोंचा रस्त्याच्या मैल क्रमांक ११२–१ येथे पूल आणि त्याचे जोडमार्ग यांच्या बांधकामासाठी प्रशासनिक मान्यता देण्याकरिता यासोबत नकाशे व अंदाज सादर करण्यात येत असून त्यासाठी होणारा अंदाजे खर्च रु. ...... इतका आहे.

तृतीय पंचवार्षिक योजनेत अंतर्भूत केलेल्या बांधकामांच्या यादीत संबंधित बांधकामाचा समावेश केला आहे (संदर्भाधीन पत्र पाहावे).

अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (इमारती व दळणवळण), मुंबई, यांनी तयार केलेले व फक्त पुलाच्या अंदाजात तरतूद करण्यात आलेले दर आवश्यक त्या ठिकाणी दुरुस्त करण्यात आले आहेत. या पुलाची जागा सिरोंचा तहसिलीतील जंगलाने व्यापलेली असल्याने विशेषत: त्या तालुक्यासाठी मंजूर करण्यात आलेले दर हे स्वीकारण्यात आलेल्या सर्वसाधारण दरापेक्षा १० टक्क्यांनी अधिक आहेत.

अंदाजामध्ये केलेल्या इतर सर्व तरतुदींचा खुलासा अंदाजाच्या सर्वसाधारण प्रतिवृत्तात करण्यात आला आहे. हा मार्ग जंगलातून जात असल्यामुळे भूमि संपादनासाठी कोणतीही तरतूद करण्यात आलेली नाही.

शासन निर्णय.—चंद्रपूर जिल्ह्यातील राज्य महामार्गाच्या आलापल्ली–सिरोंचा रस्त्यावरील ११२–१ या मैलातील नाल्यावर पुलाचे बांधकाम करण्यासाठी रु. .......... इतक्या अंदाजी रकमेस (... ............ रुपये फक्त) पुढीलप्रमाणे प्रशासनिक मान्यता देण्यात येत आहे :

| | | रुपये |
|---|---|---|
| (एक) पूल | .. | .... |
| (दोन) जोडमार्ग | .. | .... |
| एकूण | .. | .... |

२. यासाठी विशिष्ट निधी उपलब्ध करून देण्यात येईपर्यंत बांधकामास सुरुवात करण्यात येऊ नये.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ..........., दिनांक ...................... यानुसार त्या विभागाच्या सहमतीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
इमारती व दळणवळण विभाग.

वित्त विभाग (शाखा आठ),

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

उप महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, नागपूर,

कार्यकारी अभियंता (इ. व द.) विभाग, चंद्रपूर,

अधीक्षक अभियंता (इ. व द.) मंडळ, नागपूर (दोन फायलींमधील नकाशे व अंदाज यांसह),

इमारती व दळणवळण मंत्री यांचे स्वीय सहायक,

इमारती व दळणवळण उप मंत्री यांचे स्वीय सहायक,

कार्यकारी अभियंता, मार्ग प्रकल्प विभाग, चंद्रपूर,

इमारती व दळणवळण विभागाच्या य व प शाखा,

यांस.

## अभ्यास ४०

पुढील मजकूर टंकलिखित करा :

नमुना 'अ'

(नियम २ पाहा)

१९. . . . . या वर्षासाठी राज्याच्या आकस्मिकता निधीतून आगाऊ रक्कम काढण्यासंबंधीचे आवेदन.

१. विभागाचे नाव .. .. कृषी

२. आवेदन क्रमांक आणि दिनांक (विभाग फाईल क्र. )

३. लागणाऱ्या अतिरिक्त खर्चाचा संक्षिप्त तपशील.

| | | रुपये |
|---|---|---|
| आस्थापनेचे वेतन | .. | |
| भत्ते व मानधन | .. | |
| आकस्मिक खर्च— | | |
| (१) आवर्ती | .. | |
| (२) अनावर्ती | .. | |
| एकूण | .. | |

४. कोणत्या परिस्थितीत अर्थसंकल्पात तरतूद करता आली नाही ? — संबंधित योजनेला नुकतेच अंतिम स्वरूप देण्यात आले असल्याने तरतूद प्रस्तावित करता आली नाही.

५. ती लांबणीवर टाकणे का शक्य नाही ? .. आकस्मिक निकडीच्या कार्यक्रमांचा एक भाग म्हणून या योजनेस मंजुरी देण्यात आली आहे. योजनेनुसार अतिरिक्त केंद्रांची स्थापना करण्यात आल्यास मांस उत्पादनात मोठ्या प्रमाणावर वाढ होईल आणि उत्तम पैदाशीची साधनसामग्री उपलब्ध होऊन निकृष्ट जातीच्या स्थानिक मेंढ्यांच्या पैदाशीमध्ये सुधारणा होऊ शकेल.

६. प्रस्तावाच्या संपूर्ण खर्चासह आकस्मिकता निधीतून यथास्थिति, वर्षासाठी किंवा वर्षाच्या कालखंडासाठी काढावयाची आगाऊ रक्कम. — रु. . . . . . . . (दि. . . . . . . पासून . . . . . . . . . . . पर्यंतच्या कालावधीचा खर्च)



Na/573-7

अभ्यास ४१

पुढील मजकूर टंकलिखित करा :

मराठीचा वापर

राज्यकारभारात . . . . करण्यास प्रोत्साहन

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

परिपत्रक क्र. ओ.एफ.एल.-१०६३-एम,

सचिवालय, मुंबई-३२ : बी.आर., दिनांक २० नोव्हेंबर १९६३/२९ कार्तिक १८८५

परिपत्रक

मराठी ही लवकरच महाराष्ट्राची राजभाषा म्हणून घोषित करण्यासाठी, विधानमंडळापुढे विधेयक मांडण्याच्या दृष्टीने, शासनाने यापूर्वीच पाऊल उचलले आहे. या परिवर्तनाला उपकारक असे वातावरण निर्माण करण्यासाठी, करावयाचे प्रारंभिक कार्य, भाषा संचालनालयाने हाती घेतलेच आहे. शासन व्यवहार संपूर्णपणे मराठीत चालविण्याची पहिली पायरी म्हणून, सरकारी कार्यालयांतून प्रशासनाच्या कामांसाठी सर्व स्तरांवर मराठी भाषेच्या वापरास प्रोत्साहन देण्याचे शासनाने ठरविले आहे. हेतू हा की, शासन व्यवहारातील मराठीकरण सुरळीतपणे घडून यावे. सर्व सरकारी कर्मचाऱ्यांनी मराठी भाषेचे पुरेसे ज्ञान संपादन करावे आणि त्या भाषेचा आपल्या कामकाजात शक्य तितक्या जास्तीत जास्त प्रमाणात उपयोग करावा, अशी शासनाची अपेक्षा आहे.

२. प्रारंभ म्हणून, पुढील काही विषयांबाबत मराठी भाषेचा जास्तीत जास्त उपयोग करण्यात यावा :

(१) राज्यातील दौऱ्यांच्या वेळी, वरिष्ठांपासून तो कनिष्ठांपर्यंत सर्व कर्मचाऱ्यांच्या दौऱ्यांचे कार्यक्रम मराठीतून दिले जावेत. यात मंत्र्यांच्या दौऱ्यांचाही समावेश होतो.

(२) राज्य शासनाच्या निरनिराळ्या विभागांखालील सर्व प्रशिक्षण शाळांतून/केंद्रांतून प्रशिक्षण देताना मराठीचा शक्यतो वापर करावा.

(३) सरकारी कर्मचाऱ्यांनी रजेचा अर्ज, अभिवेदन वगैरे सर्व प्रकारचे अर्ज मराठी भाषेतून सादर करावेत.

(४) सर्व अधिकाऱ्यांनी आपापली प्रतिवेदने मराठीतून सादर करावीत. असे एखादे प्रतिवेदन तांत्रिक स्वरूपाचे असेल, किंवा संबंधित विषयाची योग्य व निश्चित परिभाषा मराठीत नसेल तर ते मराठीत नसले तरी चालेल.

(५) ठरीव स्वरूपाच्या प्रकरणांतील टिप्पण्या आणि मसुदे मराठीतून लिहिण्याचा उपक्रम सुरू करावा, आणि इतर प्रकरणांतही शक्य तितक्या जास्त प्रमाणावर मराठीचा वापर करण्याचा प्रयत्न करावा.

(६) ग्रामीण विभागातील रहिवासी आणि संस्था यांच्याशी ज्या विभागांचा निकट संपर्क येतो त्या सर्व विभागांनी, विशेषत: शिक्षण, समाजकल्याण, प्रसिद्धी, महसूल वगैरे विभागांनी, शक्य तितक्या जास्तीत जास्त प्रमाणात मराठीचा वापर करावा.

(७) सरकारी कर्मचाऱ्यांना मराठी भाषेत प्राविण्य संपादन करणे सुलभ व्हावे आणि त्यांना त्या भाषेचा रोजच्या कार्यालयीन व्यवहारात उपयोग करण्याचा सराव व्हावा या हेतूने प्रत्येक सरकारी कार्यालयात एक मराठी ग्रंथालय सुरू करावे. या बाबतीत आवश्यक वाटल्यास मराठी ग्रंथ संग्रहालयासारख्या संस्थांचे साहाय्य आणि सहकार्य घ्यावे.

३. सुरुवातीला सोपी मराठी भाषा वापरावी. जर एखादा इंग्रजी संज्ञेचा किंवा शब्दाचा मराठी प्रतिशब्द माहीत नसेल तर तीच इंग्रजी संज्ञा किंवा शब्द देवनागरी लिपीमध्ये लिहिण्यास हरकत नाही. अर्थ अधिक सुस्पष्ट करण्याची आवश्यकता भासल्यास मराठी पर्यायापुढे कंसात इंग्रजी संज्ञा किंवा शब्द रोमन लिपीत लिहिला तरी चालेल.

४. मराठी टंकलेखकांची संख्या आज कमी आहे, तसेच, मराठी टंकलेखन यंत्रेसुद्धा पुरेशा प्रमाणात उपलब्ध नाहीत. परंतु त्यासाठी अडून न राहता आवश्यक असेल तेव्हा पत्रे हाताने लिहून काढावीत. परिपत्रकांच्या बाबतीतदेखील स्टेन्सिल कागदावर हाताने मजकूर लिहावा.

५. पत्रांवरील पत्ते देवनागरी लिपीत लिहावे, परंतु निरनिराळ्या कर्मचाऱ्यांच्या इंग्रजी पदनामांचे मराठी पर्याय डाक विभागाला परिचित नसल्यामुळे, इंग्रजी पदनाम देवनागरी लिपीत लिहावे आणि त्याच्याच खाली कंसात त्याचा मराठी पर्याय लिहावा. इंग्रजी पदनामांचे मराठी पर्याय सर्व संबंधितांच्या अंगवळणी पडेपर्यंत ही पद्धती अवलंबावी.

६. ज्या कर्मचाऱ्यांना मराठी भाषा पुरेशी अवगत नाही, त्यांनी सध्या इंग्रजी भाषेचा वापर चालू ठेवण्यास हरकत नाही, परंतु त्यांनी संभाषण, वाचन आणि लेखन यांच्याद्वारे मराठी भाषा शिकण्याचा मन:पूर्वक प्रयत्न करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

अभ्यास ४२

पुढील मजकूर टंकलिखित करा :

अधिसूचना

ग्रामविकास विभाग

सचिवालय, मुंबई, दिनांक १६ एप्रिल १९६२

महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१

क्रमांक झेड्पीआर-५३६१-७५११-आर-दोन.—महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ५) याचे कलम २७४, पोट-कलम (२); खंड (पाच) व (सहा) आणि कलम १९ चे पोट-कलम (२) व कलम २० अन्वये महाराष्ट्र शासनास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा आणि त्या बाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर सर्व शक्तींचा वापर करून आणि ह्या बाबतीत करण्यात आलेले व उक्त अधिनियमाच्या अकराव्या अनुसूचीच्या परिच्छेद २ च्या खंड (ह) अन्वये अमलात असण्याचे चालू ठेवलेले पूर्वीचे सर्व नियम रद्द करून, महाराष्ट्र शासन याद्वारे पुढील नियम करीत आहे. हे नियम उक्त कलम २७४ च्या पोट-कलम (३) अन्वये आवश्यक असल्याप्रमाणे आगाऊ प्रसिद्ध करण्यात आले होते :—

१. संक्षिप्त नाव.—ह्या नियमांस महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या (अधिग्रहण करण्यासंबंधीच्या तरतुदी) नियम, १९६२ असे म्हणावे.

२. व्याख्या.—ह्या नियमांत, "कलम" म्हणजे, महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ५) याचे कलम.

३. जागा, वाहने, जलयाने व जनावरे यांचे अधिग्रहण करण्यासंबंधीचा आदेश बजावण्याची रीत.—कलम १९ अन्वये अधिग्रहण करण्यासंबंधीचा आदेश पुढील रीतीने बजावण्यात आला पाहिजे :—

(अ) असा आदेश ज्या इसमास उद्देशून काढण्यात आला असेल तो इसम महामंडळ किंवा पेढी असेल त्या बाबतीत, व्यवहार प्रक्रिया संहिता, १९०८ (सन १९०८ चा अधिनियम ५) च्या पहिल्या अनुसूचीतील आदेश २९ चा नियम २ किंवा यथास्थिति आदेश ३० चा नियम ३ यात, आज्ञापत्र बजावण्यासाठी ज्या रीतीची तरतूद केली असेल त्या रीतीने, आणि

(ब) असा आदेश एखाद्या व्यक्तीच्या नावे काढला असेल, तर त्या बाबतीत—

(१) असा आदेश व्यक्तिशः त्याच्या स्वाधीन करून किंवा त्यास देऊन, किंवा

(२) डाक नोंदणीद्वारा पाठवून, किंवा

(३) जर असा इसम सापडत नसेल तर, अशा आदेशाची एक अधिकृत प्रत त्याच्या कुटुंबातील कोणत्याही प्रौढ व्यक्तीस देऊन किंवा ज्या जागेत तो शेवटी राहात असल्याचे किंवा धंदा करीत असल्याचे, किंवा लाभासाठी जातीने काम करीत असल्याचे माहीत असेल, त्या जागेच्या एखाद्या ठळक भागी त्या आदेशाची एक प्रत चिकटवून.

४. कलम २० अन्वये बाब निर्णयासाठी लवादाकडे सोपविण्याकरिता अर्ज करण्याची मुदत.—कलम २०, पोट-कलम (१) अन्वये ठरविण्यात आलेल्या नुकसान-भरपाईच्या रकमेमुळे आपले नुकसान झाले आहे असे समजणाऱ्या कोणत्याही हितसंबंधित इसमास किंवा त्या कलमाच्या पोट-कलम (२) अन्वये ठरविण्यात आलेल्या नुकसानभरपाईच्या रकमेमुळे आपले नुकसान झाले आहे असे समजणाऱ्या अशा वाहनाच्या, जलयानाच्या किंवा जनावराच्या मालकास, ती बाब निर्णयासाठी लवादाकडे सोपवण्याकरिता ज्या मुदतीत अर्ज करता येईल ती मुदत, ज्या तारखेस अशा नुकसानभरपाईची रक्कम ठरविण्यात आली असेल त्या तारखेपासून चौदा दिवसांची किंवा, अशा नुकसानभरपाईची रक्कम हितसंबंधित इसमाच्या किंवा यथास्थिति मालकाच्या अनुपस्थितीत ठरविण्यात आली असेल तर अशी रक्कम ठरविल्याबद्दल त्या इसमास किंवा मालकास ज्या तारखेस सूचना पाठविण्यात आली असेल त्या तारखेपासून चौदा दिवसांची असेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शासन सचिव.

## अभ्यास ४३

पुढील मजकूर टंकलिखित करा :

सामान्य प्रशासन विभाग, ' ' शाखा.

भूतपूर्व नागरी पुरवठा विभागातील उमेदवार आणि सध्या................ यांच्या कार्यालयात चपराशी म्हणून काम करीत असलेले सर्वश्री................ आणि................यांची वयोमर्यादा शिथिल करण्याच्या प्रश्नावर विचार करावयाचा आहे. या व्यक्तींच्या सेवांचा तपशील खाली दिल्याप्रमाणे आहे :

| अनुक्रमांक | पदधारकाचे नाव | जन्मतारीख | भूतपूर्व नागरी पुरवठा विभागातील सेवाकाल | भूतपूर्व नागरी पुरवठा विभागातील नियुक्तीच्या वेळी असलेले वय | ....... ....... यामधील नियुक्तीची तारीख |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | वर्षे महिने | |
| १ | श्री. ........ | ....... | ........ | ......... ... | ........ |
| २ | श्री. ........ | ....... | ........ | ......... ... | .......... |

वर दिलेल्या सेवाविषयक तपशिलावरून असे दिसून येईल की, सर्वश्री............ आणि ......... हे अनुक्रमे १२ आणि ८ वर्षांनी वयाधिक होते. शासन निर्णय, राजनैतिक व सेवा विभाग क्रमांक ............, दिनांक ............... यातील परिच्छेद २ (एक) अनुसार भूतपूर्व नागरी पुरवठा विभागातील, व त्याखालील कार्यालयांतील प्रथम नियुक्तीच्या वेळी ज्या व्यक्ती वयाधिक होत्या त्यांची अन्य पर्यायी पदावर नियुक्ती करताना त्यांना वयाच्या बाबतीत सेवेच्या प्रत्येक तीन पूर्ण वर्षांसाठी एक वर्षाची सूट देण्यात आली आहे. तसेच सर्वश्री .......... आणि .......... ......हे मागास वर्गात येत असल्याने ते वयाच्या बाबतीत.........वर्षांची सूट मिळण्यास पात्र आहेत. वरील दोन्ही कारणांसाठी वयाच्या बाबतीत सूट देऊनही ते वयाधिक राहतात. श्री. ...............हे दिनांक...........रोजी सेवानिवृत्त होणार आहेत. जर या व्यक्तींना शासकीय सेवेत कायम केले नाही तर त्यांना निवृत्तिवेतनाचे कोणतेही लाभ न मिळता सेवानिवृत्त व्हावे लागेल. भूतपूर्व नागरी पुरवठा विभागाच्या कर्मचाऱ्यांना वयोमर्यादेच्या सवलती देणारे आदेश पुष्कळच अगोदर म्हणजे

..........मध्ये काढण्यात आले होते. तथापि ...................., यांच्या कार्यालयाने सर्वश्री.................आणि................यांच्या वयोमर्यादा शिथिल करण्याचा प्रस्ताव सुमारे ११ वर्षांच्या कालावधीनंतर सादर केलेला आहे. वर नमूद केल्याप्रमाणे ह्या दोन्ही व्यक्तींची प्रकरणे नेहमीच्या नियमांच्या कक्षेत बसत नसल्याने अनुकंपा म्हणून ती विचारात घेण्यात यावीत.

(आद्याक्षरी)

## अभ्यास ४४

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

प्रत्येक कैद्याने भोगलेली शिक्षा आणि त्यांना मिळालेली शिक्षेतील सूट यांचा तपशील खाली दर्शविण्यात आला आहे :

| | व. | म. | दि. | व. | म. | दि. | व. | म. | दि. | व. | म. | दि. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ......पर्यंत प्रत्यक्षपणे भोगलेली शिक्षा. | १३ | ५ | १२ | १३ | ५ | १२ | १३ | ५ | १२ | १३ | ५ | १२ |
| त्या तारखेपर्यंतची सामान्य सूट. | २ | ९ | २१ | ३ | २ | १७ | ३ | ५ | ९ | ३ | ७ | ० |
| त्या तारखेपर्यंतची राज्या-कडून मिळालेली सूट. | ४ | ४ | ० | ५ | २ | ० | १ | ० | ० | १ | ० | ० |
| ......पर्यंत दिलेली सूट धरून भोगलेली एकूण शिक्षा. | २० | ७ | ३ | २१ | ९ | २९ | १७ | १० | २१ | १८ | ० | १२ |
| भोगावयाची राहिलेली शिक्षा. | ... | | | ३ | २ | १ | ७ | १ | ९ | ६९ | १ | १८ |
| एकूण .. | ... | | | २५ | ० | ० | २५ | ० | ० | २५ | ० | ० |

पुढील मजकूर टंकलिखित करा :

## भारत बँक लिमिटेड

भारत भवन,
फिरोजशहा मेहता मार्ग,
मुंबई, दिनांक..........

मेसर्स प्रवीणचंद्र मेहता आणि कंपनी,
महात्मा गांधी मार्ग,
फोर्ट, मुंबई.

प्रिय महोदय,

भारत सरकारच्या पाच लाख रुपये किमतीच्या पेपर सिक्युरिटीवर आपणांस जास्तीत जास्त चार लाख रुपयांपर्यंत अधिक रक्कम काढता यावी अशी जी व्यवस्था उभयतांच्या संमतीने करण्यात आली होती तीकडे या पत्रान्वये आम्ही आपले लक्ष वेधू इच्छितो.

२. आपल्या खात्याच्या वरवर केलेल्या तपासणीवरून आमच्या असे निदर्शनास आले आहे की अशा रीतीने आपण अधिक रक्कम काढल्याचे प्रसंग फार थोडे आहेत. ज्यावेळी आपण अधिक रक्कम काढली आहे त्यावेळीही ती २०,००० रुपयांवर कधी गेलेली नाही. किंबहुना, वस्तुस्थिती अशी आहे की गेल्या वर्षातील तेजीच्या दिवसांतही आपल्या खाती वरीचशी शिल्लकच जमा होती.

३. यासंबंधात आम्हांला आपणांस हे कळवणे भाग आहे की, आपल्या खात्याचा व्यवहार आम्हांला फायदेशीर वाटत नाही. कारण आपण चार लाख रुपयांपर्यंत एका वेळी रक्कम काढाल असे गृहीत धरून आम्हांला रोकड रकमेची व्यवस्था ठेवावी लागते. परंतु पैसे काढण्याची आपली जी अधिकारमर्यादा आहे तीमुळे आमच्यावर जो आर्थिक बोजा पडतो त्याच्या प्रमाणात आपणाकडून मिळणाऱ्या व्याजाने आमची भरपाई होत नाही. अशा प्रकारची खाती चालू ठेवण्यास उत्तेजन देऊ नये असेच वस्तुतः आमच्या बँकेचे सर्वसाधारण धोरण आहे. असे असले तरी आपणाबरोबर असलेले आमचे जुने संबंध लक्षात घेऊन केवळ अपवाद म्हणून आम्ही आपले खाते चालू ठेवण्यास तयार आहोत. परंतु त्याकरिता आपण कमीत कमी पन्नास हजार रुपयांवरील व्याज आकारण्यास मान्यता दिली पाहिजे. या व्यवस्थेमुळे चार लाख रुपयांच्या मर्यादेपर्यंत अधिक रक्कम काढण्याच्या आपणांस सध्या असलेल्या अधिकारास कोणताच बाध येत नाही. तेव्हा आपण या व्यवस्थेस मान्यता द्याल असा आम्हांस विश्वास वाटतो.

४. वरीलप्रमाणे किमान रकमेवर व्याज आकारण्याची जी व्यवस्था आम्ही सुचविली आहे तिला आपली मान्यता असल्याचे आपण पत्राद्वारे आम्हांला त्वरित कळवाल अशी आशा आहे.

५. आपल्या आर्थिक उलाढालींच्या व्याप्तीची आम्हांस काही कल्पना असणे शक्य नाही. परंतु आम्ही वर सुचविलेली नवीन योजना आपणांस कोणत्याही कारणामुळे गैरसोयीची वाटत असल्यास आपण दुसरी पर्यायी योजना सुचवू शकता. तिचा आम्ही अवश्य योग्य तो विचार करू.

६. आपला काय विचार आहे तो शक्य तितक्या लवकर कळविण्याची कृपा करावी.

आपले विश्वासू,

महाव्यवस्थापक.

अभ्यास ४६

पुढील मजकूर टंकलिखित करा :

## महाराष्ट्र सहकारी बँक लिमिटेड

महाराष्ट्र भवन,
महात्मा गांधी मार्ग, फोर्ट,
मुंबई, दिनांक . . . . . . . . . .

श्री. ज. द. दोंदे,
विजय निवास,
गोखले रोड, मुंबई.

प्रिय महोदय,

गेल्या आठवडयात आमच्या बँकेच्या दादर शाखेने आपल्या १२,०००/- रुपयांच्या चेकचे पैसे देण्याचे नाकारल्याबद्दल तक्रार करणारे आपले दिनांक ९ जानेवारी १९९२ चे पत्र मिळाले. चेकचे पैसे नाकारल्यामुळे आपली जी गैरसोय झाली त्याबद्दल अतिशय खेद वाटतो.

२. आपणांस आठवत असेल की, दादर शाखेतून रकमा काढण्याच्या व्यवस्थेबाबत आपले जे बोलणे झाले होते त्यात खासकरून असे ठरले होते की, त्या शाखेतून आपणांस एका आठवडयात जास्तीत जास्त १०,००० रुपयांपर्यंत रक्कम काढता येईल. आपण अगोदर तसे सूचित केले असते तर ही मर्यादा वाढवून देण्यात आम्हांला अतिशय आनंद वाटला असता हे लिहिण्याची आवश्यकता आहे असे नाही.

३. त्याचबरोबर, आमच्या दादर शाखेने मला विचारल्याशिवाय आपल्या संबंधित चेकचे पैसे देण्याचे नाकारावे याबद्दल मला प्रथम आश्चर्य वाटले हेही मला नमूद केले पाहिजे. त्या शाखेच्या व्यवस्थापकांना मी याबाबत टेलिफोनवर स्पष्टीकरणही विचारले. तेव्हा व्यवस्थापकांनी त्याबाबत चौकशी करून मला असे कळविले की, ज्यावेळी आपण चेक दिला त्यावेळी चेकची रक्कम अधिकृत मर्यादेपेक्षा जास्त असल्याचे संबंधित कारकुनाने आपल्या निदर्शनास आणले. त्यावर चेकची रक्कम अधिकृत मर्यादेपेक्षा जास्त असली तरी खास बाब म्हणून संबंधित चेकचे पैसे द्यावेत अशी विनंती करण्याऐवजी आपण लगेच तो चेक रद्द केला व दुसरा १०,००० रुपयांचा चेक हजर केला. त्यामुळे त्या कारकुनाला साहजिकच

असे वाटले की, केवळ गैरसमजुतीमुळेच प्रथम आपण जास्त रकमेचा चेक हजर केला होता. आपणांस जास्त रकमेची आवश्यकता होती व ती न मिळाल्यामुळे आपली गैरसोय होईल याची त्यास यत्किंचितही कल्पना आली नाही. त्याला तशी पुसटशी जरी शंका आली असती तरी ती बाब त्याने व्यवस्थापकांना कळविली असती.

४. मी वर जे लिहिले आहे त्यावरून संबंधित दुःखद प्रसंग केवळ गैरसमजामुळे उद्‌भवला हे आपण निःशंकपणे मान्य कराल आणि म्हणून तो आपण मनावर घेणार नाही अशी आशा आहे.

आपले विश्वासू,

व्यवस्थापक.

अभ्यास ४७

पुढील मजकूर टंकलिखित करा :

भारत ट्रेडिंग कंपनी लिमिटेड

७, विठ्ठलभाई पटेल मार्ग,
गिरगाव, मुंबई ४०० ००४,
दिनांक . . . . . . . . . . . . .

मेसर्स ग. स. देवधर आणि कंपनी,
६३, काळबादेवी रोड,
मुंबई ४०० ००२.

प्रिय महाशय,

आपल्या दिनांक ११ जुलैच्या पत्राबद्दल आम्ही आपले आभारी आहोत. आपल्या धंद्यात अनपेक्षित मंदी आली आहे आणि त्यामुळे आपणांस आमचा हिशेब वेळेवर चुकता करणे शक्य झाले नाही हे वाचून आम्हांस अतिशय वाईट वाटले. तसेच, आपणाकडून आमच्याकडे जी रक्कम येणे आहे ती आपण नजीकच्या भविष्यकाळात चुकती करू शकणार नाही असे आपण आम्हांस जे कळविले आहे त्याबद्दल आम्हांस खेद वाटतो.

२. या बाबतीत आम्हांस आपणाला हे कळविणे भाग आहे की, अगोदरच आम्हांला आपल्याकडील रकमेसाठी पुष्कळ दिवस थांबावे लागले आहे. आम्हांला अशा तऱ्हेचे कित्येक हिशेब हाताळावे लागत असल्याने प्रत्येकाकडे थोडी थोडी जरी रक्कम बाकी राहिली तरी अशी सर्व बाकी मिळून कित्येक हजारांच्या घरात जाते ही गोष्ट आपल्या लक्षात येईल. ही गोष्ट धंद्याच्या दृष्टीने आम्हांस फार काळ परवडणारी नाही हे आपणही कबूल कराल असे वाटते. शिवाय असे की, तरत म्हणून आम्ही आमची देणी देऊन टाकण्याच्या बाबतीत अतिशय तत्पर असल्यामुळे आमच्या ग्राहकांकडूनही आम्ही तशीच अपेक्षा करतो. म्हणून आपणाकडील हिशेब सध्या आहे तसाच घोळात ठेवणे यापुढे आम्हांला शक्य नाही याबद्दल आम्हांला फार वाईट वाटते.

३. तथापि, आपले व आमचे इतक्या दिवसांचे संबंध लक्षात घेता आपल्या अडचणीतून मार्ग काढण्याच्या बाबतीत आम्ही आपणांस मदत करण्यास तयार आहोत. आमचा जो माल आपण अद्यापपर्यंत विकू शकला नाही तो आपण आपल्या खर्चाने आमच्याकडे परत करावा. त्यायोगे आपले देणे बऱ्याच प्रमाणात कमी होईल आणि राहिलेली बाकी आपण एका हप्त्याने किंवा दोन मासिक हप्त्यांनी परत करू शकाल.

४. आमची वरील सूचना आपणांस मान्य आहे काय आणि असल्यास आमचा न विकला गेलेला माल परत करण्याच्या व बाकी रक्कम चुकती करण्याच्या बाबतीत आपण काय व्यवस्था करता ते उत्तरी त्वरित कळविण्याची कृपा करावी. आपल्या उत्तराची आम्ही वाट पाहात आहोत. आमची निराशा होणार नाही अशी आशा आहे.

आपले विश्वासू,
भारत ट्रेडिंग कंपनी लिमिटेड यांच्याकरिता,

व्यवस्थापक.

अभ्यास ४८

पुढील मजकूर टंकलिखित करा :

## प्रकाश ट्रेडिंग कंपनी लिमिटेड

सहकार भवन,<br>सेनापती बापट मार्ग, मुंबई,<br>दिनांक . . . . . . . . . . . . . .

श्री. वसंतराव चंदावरकर,<br>पेडर रोड,<br>मुंबई.

महोदय,

दिनांक ८ फेब्रुवारीला झालेल्या बोर्डाच्या सभेच्या कामकाजाच्या टिप्पणीची एक प्रत आपल्या माहितीसाठी सोबत पाठविली आहे. त्यातील दादर येथे दहा लाख रुपये किंमतीच्या जमिनीच्या खरेदीसंबंधीच्या विषयाकडे मी आपले खास लक्ष मुद्दाम वेधू इच्छितो.

२. वरील जमिनीच्या खरेदीसंबंधीची सूचना श्री. अविनाश गोगटे यांनी मांडली आणि श्री. शिवाजीराव कदम यांनी तिला पाठिंबा दिला.

३. या सूचनेला काही सभासदांनी जोरदार विरोध केला. त्यांचे म्हणणे असे होते की, वरील किंमतीस जमीन घेतल्यास खर्चवेच वजा जाता त्या रकमेवर दोन टक्क्यांपेक्षा जास्त व्याज मिळणार नाही. विशेषत: पैसे गुंतविण्याचे अधिक लाभदायी ठरणारे दुसरे काही प्रस्ताव समोर असताना ही जमीन खरेदी करणे कंपनीच्या हिताचे मुळीच ठरणार नाही.

४. जमीन खरेदीच्या सूचनेवर जी चर्चा झाली तीमध्ये अध्यक्षांनी उपस्थित असलेल्या सभासदांच्या निदर्शनास ही गोष्ट आणून दिली की, श्री. गोगटे यांच्या सूचनेचा विचार करीत असताना सदरहू जमिनीची खरेदी ही एक दीर्घ मुदतीची गुंतवणूक होणार आहे हा महत्त्वाचा मुद्दा लक्षात घेणे अत्यंत जरूर आहे. अध्यक्षांनी असे प्रतिपादन केले की, ज्या भागामध्ये ही जमीन आहे तो भाग लवकरच विकास पावणार आहे आणि त्यामुळे साहजिकच जमिनीच्या किंमतीत फार मोठी वाढ होणार आहे. त्यावेळी कंपनीला वाटल्यास ती जमीन वाढलेल्या किंमतीस विकता येईल किंवा धंद्याच्या दृष्टीने उपयुक्त असे भरपूर भाडे मिळवून देणारे गाळे तीवर बांधता येतील.

५. त्यानंतर अध्यक्षांचा दृष्टिकोन सभासदांनी एकमताने मान्य केला व श्री. गोगटे यांची सूचना एकमताने मंजूर झाली.

६. जोगेश्वरी येथे नवजीवन सहकारी सोसायटीला कंपनीने जे गाळे बांधून दिले आहेत त्यांचे बांधकाम सदोष असल्याबद्दल सोसायटीकडून जे पत्र आले होते त्याचाही विचार बोर्डाने केला हे आपणांस कामकाजाच्या-टिप्पणीवरून कळून येईलच. या बाबतीत संबंधित इंजिनिअर्सकडून आलेले स्पष्टीकरण अध्यक्षांना पुरेसे समाधानकारक वाटले असले तरी, सोसायटीला तक्रारीला यत्किंचितही जागा राहू नये म्हणून या बाबतीत तज्ज्ञ व्यक्तींमार्फत आवश्यक ती तांत्रिक चौकशी करण्याचे बोर्डाने ठरविले.

७. कामकाजाचे इतर विषय नैमित्तिक स्वरूपाचे असल्यामुळे त्याबाबत स्पष्टीकरणाची आवश्यकता आहे असे मला वाटत नाही. तथापि, एखाद्या मुद्द्याबाबतचे स्पष्टीकरण आपणांस पाहिजे असल्यास तसे कळवावे, म्हणजे ते मी ताबडतोब करीन.

आपला विश्वासू,

सचिव.

अभ्यास ४९

पुढील मजकूर टंकलिखित करा :

## दि मोरारजी गोकुळदास मिल्स लिमिटेड

जा. क्र.

मुंबई, दिनांक ..........

मेसर्स पोपटलाल आणि कंपनी,
कापडाचे व्यापारी,
नागपूर.

प्रिय महाशय,

सुमारे चार महिन्यांपूर्वी आपले एक पत्र आमच्याकडे आले होते. त्यात आमच्या गिरणी-मधून स्वस्त दराची पण टिकाऊ पातळे काढून मिळतील काय, एकदम किती नग घ्यावे लागतील, मोठ्या प्रमाणावर मालाची उचल केल्यास कोणत्या सवलती मिळतील वगैरे चौकशी केलेली होती. त्या वेळी तशी सवड नसल्यामुळे आम्ही इकडून कळविले होते की आपल्या पत्राचा विचार तात्बडतोब करता येण्यासारखा नाही, पण आम्ही आपले पत्र नोंदवून ठेवतो व सुमारे चार-पाच महिन्यांत काय करता येईल ते कळवितो.

२. आज पत्र पाठविण्याचे कारण असे की, आपल्या पत्राचा विचार करण्यासारखी परिस्थिती निर्माण झालेली आहे. तेव्हा आपली पूर्वीची मागणी कायम असल्यास कळवावे, म्हणजे पुढचा व्यवहार ठरविता येईल.

३. आपल्या वरील पत्राचा विचार करता, दोन-तीन माग केवळ आपणाकरिता राखून ठेवून आपणाला हवा तसा माल काढून देता येईल. साधारणपणे, अडीचशे ते तीनशे नग आपण दरमहा उचलले पाहिजेत, म्हणजे आपल्या अपेक्षेप्रमाणे आपणाशी सहकार्य करता येईल.

४. दुसरी गोष्ट, सुरुवातीस निदान सहा महिने तरी आपण वरीलप्रमाणे नग घेण्याचे निश्चित केले पाहिजे. म्हणजे माल तयार करण्यास लागणारा कच्चा माल, सूत, रंग इत्यादी एकदम भरून ठेवता येईल. मग दरमहा पातळांचा योग्य तितका पुरवठा करण्यास अडचण पडणार नाही.

५. वरील प्रकारची योजना खास आपणाकरिताच आम्ही करणार आहोत. म्हणून कच्चा माल घेऊन ठेवण्यास किमान दहा हजार रुपये आपण आमच्याकडे गुंतवून ठेवले पाहिजेत. ते शक्य नसेल तर एखाद्या बँकेतर्फे हवाला दिला तरी चालेल.

६. वरील अटी लक्षात घेऊन आपण काय ठरविता ते तावडतोब कळवावे, म्हणजे आम्हांला पुढील तयारीला लागणे सोपे जाईल.

७. आपले व आमचे सहकार्य व्हावे, धंदा वाढवावा, उभयपक्षी फायदा व्हावा आणि जनसेवा घडावी अशी आमची मनापासून इच्छा आहे आणि तेवढ्याकरिता आपणांस आम्हांला जेवढ्या सवलती देता येतील तेवढ्या आम्ही देऊ ही खात्री बाळगावी. त्यासंबंधीचे सविस्तर बोलणे करण्यास मात्र आपणांस आमच्याकडे यावे लागेल.

पत्राचे उत्तर त्वरित पाठवावे.

आपले विश्वासू,

व्यवस्थापक.

पुढील मजकूर टंकलिखित करा :

## सन १९६६ चे विधानपरिषद विधेयक क्रमांक २

### प्रिन्स ऑफ वेल्स वस्तुसंग्रहालय अधिनियम, १९०९ यात आणखी सुधारणा करण्यासाठी विधेयक.

ज्याअर्थी, यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, प्रिन्स ऑफ वेल्स वस्तुसंग्रहालय अधिनियम, १९०९ यात आणखी सुधारणा करणे इष्ट आहे;

त्याअर्थी, भारतीय गणराज्याच्या अठराव्या वर्षी, याद्वारे पुढीलप्रमाणे अधिनियम करण्यात येत आहे :—

१. या अधिनियमास, प्रिन्स ऑफ वेल्स वस्तुसंग्रहालय (सुधारणा) अधिनियम, १९६७, असे म्हणता येईल. संक्षिप्त नाव.

२. प्रिन्स ऑफ वेल्स वस्तुसंग्रहालय अधिनियम, १९०९ (यात यापुढे ज्याचा उल्लेख "मुख्य अधिनियम" असा करण्यात आला आहे) याचे कलम २, पोट-कलम (२) मध्ये,— सन १९०९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २ ची सुधारणा.

(अ) खंड (ब) नंतर, खालील मजकूर दाखल करण्यात येईल :—

"(ब-१) कला संचालक, महाराष्ट्र राज्य;"

(ब) खंड (क) ऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

"(क) अधिष्ठाता, सर जमशेटजी जीजीभॉय कला शाळा;"

(क) खंड (क) नंतर, खालील मजकूर दाखल करण्यात येईल :—

"(क-१) संचालक, पुराभिलेख व पुरातत्त्वशास्त्र, महाराष्ट्र राज्य."

पुढील विवरण टंकलिखित करा :

## खर्चाचे विवरण

| अनु-क्रमांक | प्रमुख/उप प्रमुख विकासाचे शीर्ष | योजनेचा खर्च |
|---|---|---|
| | **समाजसेवा** | (कोटींमध्ये रुपये) |
| १ | सामान्य शिक्षण (ई.बी.सी. चा समावेश करून) .. .. | ८१.२० |
| २ | तांत्रिक शिक्षण (शिल्पी प्रशिक्षणाचा समावेश करून) .. .. | २७.१८ |
| ३ | आरोग्य— | |
| | (अ) वैद्यकीय व शुश्रुषा .. .. .. | २३.२८ |
| | (ब) आरोग्य .. .. .. | ८.६८ |
| | (क) आयुर्वेद .. .. .. | ०.६० |
| | (ड) हाफकिन संस्था .. .. .. | १.१० |
| | (ई) होमिओपाथिक व बायोकेमिक पद्धती .. .. | ०.०४ |
| | (फ) नगर पाणीपुरवठा .. .. .. | १०.३८ |
| | (ग) ग्रामीण पाणीपुरवठा .. .. .. | १.४० |
| ४ | गृहनिर्माण व नगरविकास— | |
| | (अ) गृहनिर्माण .. .. .. .. | ३३.१६ |
| | (ब) नगरविकास .. .. .. .. | ५.८४ |
| ५ | मागासलेल्या वर्गांचे कल्याण .. .. .. | १७.७४ |
| ६ | समाजकल्याण .. .. .. .. | २.४० |
| ७ | सांस्कृतिक कार्य .. .. .. .. | ०.९७ |
| ८ | कामगार कल्याण (शिल्पी प्रशिक्षण वगळून) .. .. | २.४२ |
| | एकूण .. | २१९.३९ |

## अभ्यास ५२

**पुढील विवरण अंकलिखित करा :**

सन १९९१-९२ च्या अखेरपर्यंत मंडळाने केलेले काम

| परियोजनेचे वर्णन | पूर्ण बांधून झालेले गाळे | एकूण खर्च |
|---|---|---|
| | | (रुपये लाखांत) |
| गलिच्छ वस्ती निर्मूलन योजना .. .. | १०,१५६ | ३६९ |
| जुन्या औद्योगिक गृहनिर्माण योजना .. .. | २,६०८ | } २७५ |
| जुन्या अल्पप्राप्ती गट गृहनिर्माण योजना .. .. | २,०७५ | |
| मिलिटरी हटमेंट्स .. .. | १,५७५ | |
| बर्मा शेल ऑईल रिफायनरीसाठी योजना .. .. | ५०० | ३७ |
| अल्पप्राप्ती गट गृहनिर्माण योजना .. .. | ७,१४५ | ४७० |
| मध्यमप्राप्ती गट गृहनिर्माण योजना .. .. | १,४७२ | २२० |
| बेघर झालेल्यांसाठी गृहनिर्माण योजना .. .. | २०० | १२० |
| पुनर्वसनाची कामे .. .. | १९,७१५ | ५०२ |
| अल्पप्राप्ती गट गृहनिर्माण योजना .. .. | ४२२ | ९ |
| अर्थसाहाय्यित औद्योगिक गृहनिर्माण योजना .. .. | २४,५२२ | १,२११ |

पुढील विवरण टंकलिखित करा :

शिक्षण व शेतीकरिता मंजूर केलेली व खर्च झालेली रक्कम

| जिल्हा | शिक्षण | | शेती | |
|---|---|---|---|---|
| | मंजूर केलेली रक्कम | खर्च | मंजूर केलेली रक्कम | खर्च |
| | रुपये | रुपये | रुपये | रुपये |
| ठाणे .. | ३३,२९३ | ४२,६९२ | १८,००० | ६३,०४९ |
| रायगड .. | ६०,३८६ | ३२,१२२ | ८८,००० | ७५,५०० |
| रत्नागिरी .. | ८२,४७८ | ६०,५९१ | ४८,४०२ | ३३,३६४ |
| नाशिक .. | ६०,३६६ | ५०,१०२ | ४४,३११ | ३९,४८१ |
| धुळे .. | ५३,८१४ | ५६,७११ | २७,८५२ | २५,१३२ |
| जळगाव .. | ६४,००० | ४६,००० | ९९,००० | ८८,८३२ |
| अहमदनगर .. | ५१,४९१ | २८,५९२ | ३८,४९५ | २५,००० |
| पुणे .. | ४४,२११ | ३९,१३२ | ४४,३४० | ३५,१२५ |
| सातारा .. | ३४,००० | ३१,५०० | ४५,००० | ४३,३३४ |
| सांगली .. | ५७,६४८ | ५९,००० | ६५,५०० | ५५,३०० |
| सोलापूर .. | ७१,००० | ६५,५२५ | ८५,४५२ | ७५,००० |
| कोल्हापूर .. | २४,९०० | २२,८५० | ६५,१४५ | ५६,५०० |

अभ्यास ५७

पुढील जमाखर्च संकलित करा :

## स्वामी विवेकानंद चॅरिटी ट्रस्ट, मुंबई

### ३१ मार्च १९९२ रोजी संपणाऱ्या वर्षाचा जमाखर्च

| जमा | रुपये पैसे | रुपये पैसे | खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|---|---|---|
| (१) भाडे | | १७,४५२.६१ | (१) महानगरपालिका कर | | ६,२०२.१४ |
| (२) व्याज | | ५७३.६० | (२) विमा | | ३८५.०० |
| (३) फी— | | | (३) इमारतीच्या किंमतीमधील घट | | ६,४३६.०० |
| (अ) छात्रालयातील विद्यार्थ्यांकडून | ६२,३२६.०० | | (४) लेखनसामग्री व छपाई | | ७०८.२७ |
| (ब) स्वास्थ्यगृहातील रोग्यांकडून | ३२,१०३.५० | ९४,४२९.५० | (५) वेतन व ऑडिट फी— | | |
| (४) दवाखान्याचे उत्पन्न— | | | (अ) वेतन | ११,०००.८७ | |
| (अ) वांद्रा येथील दवाखान्याचे | ५,२८६.०९ | | (ब) ऑडिट फी | २००.०० | ११,२००.८७ |
| | | | (६) टपाल, तिकिटे व दिवाबत्ती खर्च | | ८,०००.४० |
| (ब) ठाणे येथील दवाखान्याचे | ४,८२२.०० | १०,१०८.०९ | (७) वीज खर्च | | ७००.१५ |
| (५) संकीर्ण उत्पन्न | | १,९०८.८१ | (८) संकीर्ण खर्च | | ३,६६९.३७ |
| | | | (९) शिक्षण खर्च | | ४६,०२१.८६ |
| (६) शिल्लक पत्रकामध्ये नमूद केलेला चालू वर्षाचा तोटा | | १४,३७५.१७ | (१०) वैद्यकीय मदत | | ५५,०३८.७२ |
| | | १,३८,८६४.७८ | | | १,३८,८६४.७८ |

अभ्यास ५५

पुढील नफातोटा पत्रक टंकलिखित करा :

## महाराष्ट्र हौसिंग कार्पोरेशन, मुंबई

### ३१ मार्च १९९२ रोजी संपलेल्या वर्षाचे नफातोटा पत्रक

| खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे | उत्पन्न | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|---|---|---|
| ठेवी, कर्जरोखे व बंधपत्रे यांवरील व्याज .. | | २,३९,८९१.३८ | व्याज :— | | |
| पगार व भत्ते— | | | (१) कर्जे व अग्रिम धन यांवरील | ५,००,६६२.९७ | |
| (अ) व्यवस्थापक संचालक .. | १८,०००.०० | | (२) गुंतवणूक व ठेवी यांवरील | ९,१६२.२९ | |
| (ब) इतर .. | ८०,८७५.३८ | | | | ५,०९,८२५.२६ |
| | | ९८,८७५.३८ | कमिशन | | ५,६३२.३२ |
| प्रवास व इतर भत्ते— | | | इतर | | १३,५८७.१९ |
| (अ) व्यवस्थापक संचालक .. | २,०७१.८९ | | | | |
| (ब) इतर .. | ८,५७७.११ | | | | |
| | | १०,६४९.०० | | | |
| संचालक व समित्यांचे सदस्य यांची फी .. | | ८,७७५.०० | | | |
| संचालक व समित्यांचे सदस्य यांचे प्रवास व इतर भत्ते .. | | ३,०५२.६२ | | | |
| कर्मचाऱ्यांचा भविष्य-निर्वाह निधी हिस्सा .. | | १,७३८.२४ | | | |
| टपाल, तारा, स्टॅम्प्स व टेलिफोन्स .. | | ६,७३५.८२ | | | |
| छपाई व लेखनसामग्री .. | | १६,४११.५३ | | | |
| बँक चार्जेस व कमिशन .. | | १,०१४.८५ | | | |
| ऑडिट व वकील फी .. | | ६,८२५.४३ | | | |
| गुंतवणूक विक्रीवरील नुकसान .. | | ७,८७०.८० | | | |
| भाडे, कर, विमा, दिवाबत्ती वगैरे .. | | ४,११८.७५ | | | |
| ताळेबंदात ओढलेला निव्वळ नफा .. | | १,२६,००५.९७ | | | |
| एकूण .. | | ५,२९,०४४.७७ | एकूण .. | | ५,२९,०४४.७७ |

पुढील मजकूर टंकलिखित करा :

आघात

अनेक वर्षांपूर्वी आपण आपल्या भवितव्याविषयी एक ध्येय निश्चित केले होते. ७१
ते ध्येय साध्य करण्यासाठी घेतलेली प्रतिज्ञा पुन: घेण्याची आज वेळ आली आहे. १४५
आज मध्यरात्री सारे जग जेव्हा शांत झोपलेले असेल तेव्हा भारतात स्वातंत्र्याचा २१८
उदय होऊन नवे चैतन्य भारताला प्राप्त होईल. दीर्घ काळपर्यंत दडपणाखाली असलेले २९७
राष्ट्र जागे करणारा, एका युगाचा अंत होऊन नवे युग सुरू करणारा असा दिवस ३६९
राष्ट्राच्या इतिहासात क्वचितच उगवत असतो. तो दिवस आता भारताच्या इतिहासात ४४३
उगवणार आहे. अशा या मंगल प्रसंगी भारताची, भारतीय जनतेची आणि त्याहूनही ५१७
श्रेष्ठ अशी मानवतेची सेवा करण्याची आज आपण पुन: प्रतिज्ञा घेऊ या. ५८०

आजपर्यंत आपण खडतर परिश्रम केले आपल्याला कधी यश आले, कधी ६४१
अपयशही आले. पण मार्गात अनेक अडचणी येऊनही, ज्या उदात्त ध्येयाने आपल्याला ७१६
सतत प्रेरणा दिली त्या ध्येयाचा आपण कधीही विसर पडू दिलेला नाही. आपल्या ७९१
दुर्दैवाचा काळ आज संपला असून भारताचे हरपलेले स्वत्व पुन: प्राप्त झाले आहे. ८६६
आज आपण जे यश साध्य केले आहे ते यश म्हणजे यापुढे यापेक्षाही महान यश ९३८
साध्य करण्यासाठी आपल्याला मिळालेली संधी आहे. भविष्यकाळाचे हे आव्हान १००७
आपण स्वीकारू या. १०१६

स्वातंत्र्य आणि सत्ता हाती आली म्हणजे ओघानेच जबाबदारीही आलीच. १०९१
आपला भविष्यकाळ आता आराम करण्याचा नाही, तर आजपर्यंत अनेक वेळा ११५४
आपण जी प्रतिज्ञा घेतली आणि आजही जिचा आपण पुनरुच्चार करणार आहोत १२२४
ती प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी अविश्रांत श्रम करण्याचा आहे. १२७४

## अभ्यास ५७

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

**आघात**

भारत ही आपली पवित्र भूमी आहे, ही कल्पना, गेल्या हजारो वर्षांपासून, ६९
आपल्या लोकांच्या अंत:करणात रुजलेली आहे, आणि या देशात अनेक राजे आणि १४३
अनेक राज्ये होऊन गेली असली आणि निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक राहात २१६
असले तरी यात्र कल्पनेने आपल्याला परस्परांशी निगडित केले आहे. २७४

गेल्या हजारो वर्षांपासून ही भूमी आपली आहे. मी उत्तरेतील राहणारा ३४४
असूनसुद्धा येथे मला अगदी घरच्यासारखे वाटते आहे, कारण मी याच देशाच्या एका ४२०
भागात आलो आहे आणि एकत्र आशा-आकांक्षा आणि एकच विचार असलेल्या ४८७
माझ्या मित्रांमध्ये, माझ्या सहकाऱ्यांमध्ये मी वावरतो आहे. हिमालयावर माझा जितका ५६४
हक्क आहे, तितकाच तुमचाही आहे, आणि कन्याकुमारी आणि मदुराई यांच्यावर ६३५
तुमचा जितका हक्क आहे तितकाच माझाही आहे. या भूमीत आपला जन्म झाला. ७०६
तिची सेवा आपल्याला करावयाची आहे. ही भूमी, हा आपला समाईक वारसा ७७४
आहे. गतकाळात, भूगोल इतिहास, संस्कृती, आशा-आकांक्षा आणि जयपराजय या ८४८
सर्वांमुळे, आपण एकाच देशाचे घटक आहोत, अशी भावना आपल्यात निर्माण ९१९
झाली आणि आज आपल्या सर्वांच्या प्रयत्नाने आणि त्यागाने आपण स्वातंत्र्य ९८८
मिळविले. आज आपण राजकीय दृष्ट्याही एक झालो आहोत. १०४१

असे असताना, थोर वारसा म्हणून आपल्याला लाभलेले हे ऐक्य आणि लढून ११११
मिळविलेले स्वातंत्र्य, आपण कसे नष्ट होऊ देऊ? आपल्या कोट्यवधी देशबांधवांचे ११९१
भवितव्य उज्ज्वल करून त्यांचे हितसंवर्धन करावयाचे हे आपले सर्वांचे समाईक १२६२
उद्दिष्ट आहे. १२७५

## अभ्यास ५८

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

आघात

महाराष्ट्र राज्याने राज्यकारभाराचे आतापर्यंतचे इंग्रजी हे परभाषीय माध्यम ७०
बदलून त्या जागी मराठीची प्रतिष्ठापना करण्याचा निर्णय घेतला व त्या दिशेने १४०
पावले टाकण्यास लागलीच सुरुवात केली. १९६० साली भाषा विभागाची निर्मिती २११
झाली व राज्यकारभाराच्या मराठीकरणासाठी आवश्यक असलेल्या तयारीचा प्रारंभ २८१
करण्यात आला. महाराष्ट्रातील लोकमतही या बाबतीत जागरूक होते. राज्यकारभार ३५४
मराठीतून व्हावा आणि तो शक्य तितक्या लवकर व्हावा अशी विधानमंडळातही ४२३
वारंवार मागणी होत होती. पण या परिवर्तनाच्या मार्गातील अनेक अडचणी दूर ४९५
झाल्याशिवाय व आवश्यक तेवढी तयारी झाल्याशिवाय हा बदल घडवून आणणे ५६४
इष्ट नव्हते. शासनयंत्रणेवर विपरीत परिणाम न होऊ देता व कारभारातील कार्य- ६३९
क्षमतेस धक्का न लागता हे झाले पाहिजे, अशीच या बाबतीत शासनाची दृष्टी होती. ७१५
म्हणूनच दरम्यानच्या काळात सबुरीचे धोरण अवलंबिण्यात आले. मराठीकरणाच्या ७८७
दृष्टीने तयारीचा भाग पुष्कळसा झाला आहे, हे थोड्या वेळापूर्वीच भाषा विभागाच्या ८६८
व संबंधित मंडळ व समित्या यांच्या कार्याचा जो अहवाल वाचण्यात आला त्यावरून ९३९
आपल्या लक्षात येईल. याच वेळी घटनेनुसार विधानमंडळाच्या कामकाजासाठी १००८
इंग्रजी चालू राहण्याची पंधरा वर्षांची मुदतही संपत आली होती. तेव्हा, मराठी १०८३
ही कायदेशीरपणे महाराष्ट्राची राजभाषा ठरविण्याचे व तिच्या जोडीला काही काळ ११५७
इंग्रजी चालू ठेवण्याचे विधेयक शासनाने विधानमंडळात मांडले व तेथे ते संमत १२३२
होऊन त्याला रीतसर अधिनियमाचे स्वरूप देण्यात आले. १२८१

## अभ्यास ५९

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

आघात

पूर्वी आपण ज्या कसोटीच्या प्रसंगांतून पार पडलो व जी उद्दिष्टे साध्य केली ७१
त्यांजकडे आपण अभिमानाने व उचित समाधानाने पाहू शकतो अशी माझी धारणा आहे. १५२
परंतु आपणास विश्रांती वा उसंत घेता येणार नाही. आपल्यापैकी बहुसंख्य लोकांच्या २३१
वाट्यास आलेले दैन्य आणि दारिद्र्य, खालावलेले जीवनमान, अज्ञान व रोगराई यामुळे ३०७
घडून आलेला अनर्थ, शिक्षणाचा अभाव आणि आपल्या जनतेपैकी पुष्कळांना जाचणारी ३८५
संधीची वाण या सर्व गोष्टी आपणास आव्हान देणाऱ्या आहेत. परंतु आपल्या सर्वांचे ४६५
चिकाटीचे प्रयत्न, अविश्रांत परिश्रम आणि स्वार्थत्याग यायोगे आपण हे आव्हान स्वीकारू ५४४
शकू. राष्ट्र उभारणीचे कार्य नुकतेच सुरू झालेले आहे आणि आर्थिक समृद्धीच्या ६२३
उद्दिष्टापासून आपण अद्यापि फार दूर आहोत. आर्थिक समृद्धीसाठी राष्ट्रीय एकात्मता ७०५
आणि ऐक्य या प्रथमावश्यक बाबी होत. म्हणून राष्ट्राच्या सेवेसाठी, जातिधर्मांचे ७८१
विविध अडसर कायमचे नष्ट करण्यासाठी आणि सबंध देशाच्या कल्याणार्थ झटण्यासाठी ८५७
आपण पुन्हा एकवार वचनबद्ध होऊ या. आपल्या देशाच्या सीमांवरील अचानक धाडींना ९३४
खंबीरपणे व धैर्याने तोंड देण्यास समर्थ होईल अशा बलाढ्य राष्ट्राची उभारणी करणे १०१७
आपणास केवळ याच मार्गाने शक्य होईल. विधानमंडळात व त्याबाहेर दोन्ही सभागृहांचे १०९९
आपण सर्व माननीय सदस्य जे परिश्रम कराल त्यावरच या उद्दिष्टांची परिपूर्ती अवलंबून ११७४
आहे. आता आपण आपल्या चर्चेस प्रारंभ करू शकता. आपली ही चर्चा फलदायी १२४७
व्हावी, अशी माझी मन:पूर्वक प्रार्थना आहे. १२८८

## अभ्यास ६०

पुढील मजकूर टंकलिखित करा :

आघात

परकीय सत्तेविरुद्ध भारताने केलेल्या मुक्तिसंग्रामाचे अजून शेष राहिलेले पर्व, ७५
इंग्रजीच्या गळचेपीतून देशी भाषा मोकळ्या झाल्याशिवाय पूर्ण होणार नाही हे १५१
आपण लक्षात घेतले पाहिजे यात इंग्रजी भाषेचे महत्त्व नाकारण्याचा भाग नाही. २२७
ती जगातील एक समृद्ध भाषा असून तिला आपली ज्ञानविज्ञानाची धात्री म्हणावी २९८
लागेल. पण याही क्षेत्रात ती मातेचे स्थान कधीही घेऊ शकणार नाही. ते स्थान ३७६
मातृभाषेचेच राहिले पाहिजे. आजवर ज्ञानविज्ञान, तंत्र, शिक्षण, प्रशासन इत्यादी ४५२
सर्वच बाबतीत इंग्रजीचे वर्चस्व होते. मातृभाषा—प्रादेशिक भाषा—उपेक्षित होत्या. ५३३
त्यांची या नानाविध अंगांनी वाढ व्हावयाची असेल तर या साऱ्या क्षेत्रांत त्या इंग्रजीची ६१२
जागा घेणे अनिवार्य आहे. या दृष्टीने, काँग्रेस कार्यकारिणीने प्रशासनाचे व विश्व- ६९२
विद्यालयीन शिक्षणाचे प्रादेशिक भाषा हेच माध्यम राहावे असा जो आदेश दिला ७६७
आहे तो स्वागतार्ह म्हणावा लागेल. याचा अर्थ इंग्रजी भाषेचे सर्वस्वी उच्चाटन केले ८४६
जाईल असा नाही. केंद्र सरकार जोपर्यंत हिंदीबरोबर इंग्रजीचा जोडभाषा म्हणून ९२४
वापर करीत राहील व वरिष्ठ आणि सर्वोच्च न्यायालयांत इंग्रजीतून काम चालेल ९९३
तोपर्यंत येथील राज्यकारभारात थोड्याफार प्रमाणात इंग्रजीचा उपयोग करावाच १०६७
लागेल व ती भाषा अवगत असणे जरुरीचे राहील. या आवश्यकतेच्या दृष्टीने तसेच ११४०
ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रातील संशोधनकार्यात व आंतरराष्ट्रीय संपर्काचे साधन म्हणून १२१७
इंग्रजी भाषेचा शालेय आणि विद्यापीठीय शिक्षणात अवश्य अंतर्भाव करावा लागेल. १२९२

## अभ्यास ६१

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

आघात

शिक्षणाचे कसलेच संस्कार ज्यांच्यावर शतकानुशतके झाले नाहीत असे ६३
अनेक घटक आमच्या समाजात आहेत, ही गोष्ट खरी. त्यांचा शैक्षणिक व सामाजिक १३७
दर्जा वाढवावयाचा तर त्यांच्यासाठी समाजाने काही खास प्रयत्न केले पाहिजेत २०५
ही गोष्टही खरी. परंतु त्यासाठी, या मागासलेल्या घटकांना शिक्षण देताना एकूण २८२
शिक्षणाचा दर्जा उतरला म्हणून कोठे बिघडले अशी वृत्ती वा दृष्टी शिक्षण- ३५४
प्रसाराच्या पुरस्कर्त्यांनी ठेवून भागणार नाही. त्यांनी शिक्षणप्रसाराची मागणी ४२९
जरूर करावी. परंतु ती मागणी शिक्षणाच्या अधिक सोयींसाठी, अधिक शाळांसाठी, ५०६
असावी. त्यांनी अशी मागणी केली तर ती पूर्ण करणे समाजाने व सरकारने ५७४
आपले कर्तव्यच मानले पाहिजे. पण शिक्षणाच्या दर्जाच्या बाबतीत समाजाने ६४१
तडजोड स्वीकारावी असा जो आग्रह शिक्षणप्रसाराचे अनेक प्रवर्तक आज धरीत ७१०
आहेत, तो आग्रह केवळ अयोग्यच नव्हे तर समाजघातक ठरणार आहे. ७७०

कारण, अशा भोंगळ शिक्षणप्रसाराने वरवर पाहता मागासलेल्या सामाजिक ८३८
घटकांतील अगर प्रादेशिक विभागांतील असंख्य तरुण शिक्षित किंवा पदवीधर ९०८
झाल्यासारखे दिसतील, शिक्षणाच्या या शिक्कामोर्तबामुळे काही नोकऱ्या व सत्तास्थाने- ९८९
ही ते मिळवू शकतील, परंतु याच तथाकथित सुशिक्षित तरुणांमधून उद्याचे शास्त्रज्ञ, १०६८
तंत्रज्ञ, कलाकार, संशोधक अगर राज्यकर्ते निर्माण होणार आहेत हे विसरून ११३८
चालणार नाही. त्यांच्या ज्ञानाचा पायाच कच्चा असेल तर समाजाची भावी १२०१
प्रगती तर खुंटेलच, परंतु अनेक अनपेक्षित संकटांस समाजाला भावी कालात तोंड १२७४
द्यावे लागेल. अपुऱ्या ज्ञानाच्या शिदोरीवर जे तरुण इंजिनिअर बनतील त्यांच्या १३४७
हाती आमच्या देशातील प्रचंड विद्युतयोजना अगर धरणे, उद्योगधंदे किंवा वाहतुकीची १४२७
साधने सुरक्षित राहतील काय? खऱ्याखुऱ्या संशोधनाशिवाय संशोधकाच्या पदव्या १५०५
ज्यांनी मिळविल्या त्यांच्याकडून देशातील रोगराईवर किंवा अन्य प्रश्नांवर खरेखुरे १५८२
संशोधन व उपाययोजना होईल का? १६१६

## अभ्यास ६२

पुढील मजकूर टंकलिखित करा :

आघात

पांथिक बंधनाने जेव्हा माणसे एकत्र येतात तेव्हा त्यांची कल्याण करण्याची ६१
शक्ती वाढत नाही. जेव्हा सहज बंधुभावनेने एकत्र येतात, स्थूल संबंध गौण १४२
समजतात, मतापेक्षा माणसाला अधिक महत्त्व देतात, बाह्य कामापेक्षा अंतर्वृत्तीला २१५
महत्त्व देतात, माणसाला माणूस म्हणून ओळखतात, त्यावेळी कल्याण करण्याची २८४
शक्ती वाढते. मी अशा पुष्कळ संस्था पाहिल्या आहेत की, ज्यांचा प्रारंभ उत्तम ३५७
हेतूने झाला आहे, पण पुढे त्यांच्या कार्यामधून दोषच उत्पन्न होऊ लागले. मग ४३४
त्या दोषांचा बचाव केला जातो. ते दोष लपवूनही ठेवले जातात. मग वृत्ती ५०५
निराळी होते. तुकडे पडू लागतात. मला तुकडे नकोत. अखंड आनंद मला ५७२
घ्यावयाचा आहे आणि तो केवळ मानसिक नव्हे. तो तर मी घेऊनच राहिलो ६४१
आहे. पण प्रत्यक्ष क्रियात्मक म्हणून कोणी कोणत्याही धर्माचा किंवा पंथाचा ७१५
असो. मी दरेकाकडे माणूस म्हणून पाहू इच्छितो. त्यानेही माझ्याकडे तसेच ७८४
पाहावे. तरच कल्याणकारी सेवा होईल. ८२०

मानवाचा आत्मा परमेशान आणि अभेदमय आहे. आणि हा जो अशांती आणि ८९३
भेद यांचा आभास होत आहे तो त्याच्या परमशांतीच्या तुलनेत नगण्य आहे. तरी ९६८
पण स्वच्छ वस्त्रावर लहानसा डागही दृष्टी खेचून घेतो. जागतिक युद्ध चालू होते १०४५
तेव्हाही मी निराश नव्हतो. मी तर असेच मानीत होतो, आणि आहे की, जागतिक १११९
महायुद्धे ईश्वरी असतात आणि काही शिक्षा देऊनच का होईना ती मानवाची उन्नती ११९६
करण्यासाठीच होतात. मला हेही माहीत आहे की, अशी महायुद्धे प्रशांत आत्म्याच्या १२७४
एका कोपऱ्यात होत राहतात. आज दिसून पडतात. थोड्या दिवसांनंतर नाहीशी १३४६
होतात. १३५३

या कमनशिबी जगात उदय कोणाचाच झालेला नाही, अजून सर्वांचा अस्तच १४१८
आहे. कोणाच्या घरात चूलच पेटत नाही, तर कोणाच्या घरातील चुलीत भाकर १४९०
जळून राहिली आहे. दोघांच्याही चुलींचा अस्त झालेला आहे. दोघेही उपाशी १५६५
आहेत. समाजातील पैसेवाल्या लोकांचा तर कधीच अस्त होऊन चुकला आहे आणि १६३८
जे दरिद्री आहेत त्यांचा तर अस्तच आहे. तुलसीदासांचे एक भजन या ठिकाणी १७०८
मला आठवते. ते ईश्वराला म्हणताहेत, "प्रेमाची रीत तुम्हीच चांगली जाणता. १७८२
मोठ्यांचा मोठेपणा तुम्ही दूर करता. आणि लहानांचा लहानपणा तुम्ही दूर करता १८५५
ही तुमची रीत आहे" मोठ्यांचा मोठेपणा कायम राखणे म्हणजे त्यांच्यावर प्रेम १९३२
करणे नव्हे. १९४३

—आचार्य विनोबा भावे

## अभ्यास ६३

पुढील मजकूर टंकलिखित करा :

आघात

सर्वोदय हा असा एक अर्थघन शब्द आहे की त्याचे जितके अधिक चिंतन आणि ६९
आचरण आपण करीत जावे. तितका अधिकाधिक अर्थ त्यातून आपल्याला कळत जाईल. १३४
सर्व अर्थ एकदम कळणार नाही. हळूहळू कळेल. परंतु त्या शब्दाचा एक अर्थ स्पष्ट आहे. २१०
ईश्वराने ज्याअर्थी या जगात मानवसमाज उत्पन्न केला आहे त्याअर्थी मानवामानवात २२०
विरोध असावा, किंवा एकाचे हित दुसऱ्याच्या हिताशी विरोधी असावे, अशी त्याची इच्छा २८९
असणे शक्य नाही. एका मुलाचे हित दुसऱ्या मुलाच्या हिताशी विरोधी असावे, असा ३६१
कोणताच बाप इच्छिणार नाही. मुलांमध्ये विचारभेद असू शकेल, परंतु हितविरोध असू ४३३
शकणार नाही. विचारांची वेगवेगळी अंगे एकत्र केल्याने एक पूर्ण विचार बनू शकतो. एकाच ५०५
व्यक्तीला पूर्ण विचार सुचेल हे संभवनीय नाही. एकाला एक अंग सुचेल, दुसऱ्याला दुसरे ५७७
सुचेल. तर तिसऱ्याला तिसरे सुचेल. अशा रीतीने सर्व अंगे मिळून एक पूर्ण विचार होतो ६५६
म्हणून विचरभेद असणे आवश्यक आहे. त्यात दोष नसून गुण आहे. परंतु हितविरोध असता ७३१
कामा नये. ८१०
परंतु आम्ही आमचे जीवनच असे बनविले आहे की एकाच्या हितात दुसऱ्याच्या हिताचा ८७६
विरोधच निर्माण होतो. धन वगैरे ज्या वस्तू आम्ही लाभदायी मानतो त्यांचा संग्रह ९४३
समोरच्यांची पर्वा न करता आणि कधी कधी त्यांना लुबाडूनही आम्ही करतो. प्रेमापेक्षाही १०२१
अधिक किंमत आम्ही धनाला, सुवर्णाला, देऊन ठेवली आहे. अशी ही सुवर्णमाया जगभर १०९१
पसरली आहे. त्यामुळे परस्परांतला एकोपा आणि समन्वय, जो वास्तविक सोपा असावयाला ११६७
पाहिजे होता, कठीण होऊन बसला आहे. १२४३
त्या एकोप्याच्या शोधात अनेक राजकीय, सामाजिक आणि आर्थिक शास्त्रेही बनली १३१४
आहेत, तरी अजून सर्वांचे हित साधतच नाही. परंतु एक साधी गोष्ट जर लक्षात घेतली १३८५
तर ते साधणार आहे. प्रत्येकाने एकमेकाची चिंता वाहावी, आणि आपली चिंताही दुसऱ्याला १४५६
तकलीफ होणार नाही अशा रीतीने वाहावी हीच ती साधी गोष्ट. कुटुंबात असेच होते. १५२९
कुटुंबातील हा न्याय समाजाला लागू करणे कठीण जाऊ नये, सोपे जावे, यालाच सर्वोदय १६०३
म्हणतात. १६८२
सर्वोदयाचा हा एक अगदी सरळ व स्पष्ट अर्थ आहे. जसजसे आम्ही अधिक प्रयोग १७२१
करीत जाऊ, तसतसे त्याचे इतरही अर्थ स्पष्ट होत जातील. परंतु हा त्याचा कमीत कमी १७८६
अर्थ आहे. यातूनच आपल्याला अशी प्रेरणा मिळते की, आपण आपल्या कमाईचे खाल्ले १८६०
पाहिजे, दुसऱ्याच्या कमाईचे खाता कामा नये. ही प्रेरणा प्रत्येकाने लक्षात घेऊन ती आपल्या १९३३
मनावर चांगली ठसवली पाहिजे. २०१२
२०६१

—आचार्य विनोबा भावे

## अभ्यास ६४

पुढील मजकूर टंकलिखित करा :

आघात

एखाद्याचे जीवन जोपर्यंत संपलेले नसते तोपर्यंत त्याच्या विचारांत बदल होत ६७
असतो. म्हणून विचारांचे परिपूर्ण दर्शन होऊ शकत नाही. विशेषत: जी माणसे १५०
नित्यनिरंतर प्रगती करीत असतात, त्यांच्या विचारांचा विकास शेवटी शेवटी फार २२२
जोराने होत असतो. तुकारामाच्या आयुष्यात हेच दिसून येते. तो सतत प्रयत्नशील २९९
महापुरुष होता. वासनांच्या क्लेशांतून सुटण्यासाठी इतका जोरदार त्याचा झगडा चालू ३७९
होता की असे दुसरे उदाहरण थोडे आढळेल. परंतु शेवटच्या—कदाचित दोन, चार, ४५७
सहा महिन्यांच्या—अवधीत त्याने जो महान अनुभव मिळविला तो त्यापूर्वी कधीच ५३०
मिळविला नव्हता. तुकारामाच्या आध्यात्मिक जीवनाची उज्ज्वल पराकाष्ठा शेवटच्या ६००
दिवसांत दिसून येते. तत्पूर्वीची त्याची साधक-दशा त्याच्या अभंगांत उघडी आहे. ६७७
शेवटल्या दोन-तीन महिन्यांत तुकारामाने जी उंच उडी मारली आहे ती सबंध ७४६
आयुष्यात तो मारू शकला नव्हता. आता ते जीवन संपल्यानंतर विचारांची समग्रता ८१९
आपल्यासमोर असल्यामुळे तो चिंतनाचा उत्तम विषय होऊ शकतो. ८७८

गांधीजींना जेव्हा कधी कोणी सांगत की, अमुक अमुक गोष्ट तुम्ही नवीन ९४७
सांगितली, तेव्हा ते म्हणत, "मी नवीन काही सांगितले आहे असे मला वाटत १०१६
नाही. आजपर्यंत अनेक थोरांनी जे सांगितले तेच आजच्या युगात कसे अमलात आणावे १०९५
याचा मी प्रयत्न करीत आहे, इतकेच" ११२९

या त्यांच्या म्हणण्यात नुसती नम्रता आहे असे मी मानीत नाही. वस्तुस्थिती ११९८
तशीच आहे. हीच भाषा येशू ख्रिस्ताची होती. तो म्हणे, "मी पूर्वजांची शिकवण १२८१
उखडून टाकण्यासाठी आलो नसून तिची पूर्णता संपादन करण्यासाठी आलो आहे" १३५५
शंकराचार्य एवढे महान. पण ते आपला विचार उत्तम तर्कांनी मांडूनही पूर्वींच्या १४२७
वचनांचा आधार देत. कोणी म्हणतात, असा आधार देणे पंगूपणा आहे. मी १५००
म्हणतो हा पंगूपणा नाही. ही बुद्धिमत्ता आहे. अनंत अनुभवांनी भरलेले अर्थघन १५७९
असे शक्तिशाली जुने शब्द जो वापरतो तो त्यांचे ऋण कधी विसरू शकत नाही. १६५२

एकदा आमचे एक मित्र महंमद पैगंबराच्या कामगिरीचे वर्णन करताना म्हणाले, १७२२
"अरब एवढे रानटी, जंगली, पण त्यांना महंमदाने मानवता दिली. केवढी महान १७९३
त्याची ही कामगिरी. थेट गांधीजींच्या कामगिरीसारखी आहे ती. गांधीजींनीदेखील १८७३
आमच्यासारख्या हीन जनांना महान बनविले" १९११

मी त्या मित्राला म्हणालो, महंमद पैगंबराविषयीची तुमची कल्पना चुकीची आहे १९८४
व तशीच गांधींच्या विषयीही. माझे हे म्हणणे ऐकून त्या मित्रांना आश्चर्य वाटलेले २०६४
दिसले. २०७०

—आचार्य विनोबा भावे

## अभ्यास ६५

**पुढील मजकूर टंकलिखित करा :**

आघात

शासनाने राज्यातील शेतीच्या उत्पादनात व विशेषतः अन्नधान्याच्या उत्पादनात ७०
वाढ करण्यासाठी जोमदार उपाययोजना करण्याचे चालू ठेवले आहे. मुख्य मंत्र्यांच्या १४४
अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेली उच्चतर कृषि उत्पादन समिती, शेतीच्या २१३
उत्पादनात वाढ करण्यासाठी शासनाने चालविलेल्या प्रयत्नांचे एकसूत्रीकरण व २८०
मार्गदर्शन करीत आहे. शेतीच्या उत्पादनात वाढ करण्यासाठी ज्या वेगवेगळ्या ३४८
योजना हाती घेण्यात आल्या आहेत त्यांनुसार मागील वर्षात साध्य केलेली उद्दिष्टे ४२४
समाधानकारक आहेत. जलसिंचनाच्या प्रयोजनासाठी नवीन विहिरी खोदणे व जुन्या ४९८
विहिरींची दुरुस्ती करणे याबाबतचा कार्यक्रम पूर्वीप्रमाणेच नेटाने पुढे चालू ठेवण्यात ५७८
आला असून सुरुंगाच्या साहाय्याने विहिरी खोदण्यासाठी वायु संपीडक (एअर ६४६
कॉम्प्रेसर) यंत्रांच्या संख्येत ६५ करून २५० पर्यंत आता वाढ करण्यात आली आहे. ७२०
चालू वर्षी ठरविलेल्या लक्ष्यानुसार १३,००० पंपही बसविण्यात येतील. ७७९

शेतीच्या उत्पादनात वाढ करण्यासाठी चालविलेल्या प्रयत्नांना अधिक गती ८४८
देण्याच्या दृष्टीने पूर्वी खरीप व रबी मोहिमा सुरू करण्यात आल्या होत्या. आतापर्यंत ९२४
या मोहिमांचे उद्दिष्ट शेतीच्या उत्पादनात सुधारलेल्या पद्धतीचा अवलंब करण्यापुरतेच १००४
मर्यादित होते. चालू वर्षापासून शासनाने नवीन भात जमिनी तयार करणे आणि १०७८
ज्वारीसाठी रोप संरक्षण योजना हाती घेणे यासारख्या विशिष्ट कामांकडे विशेष ११५५
लक्ष देण्याचा निर्णय घेतला आहे. या वर्षी रबीच्या हंगामातदेखील हे जोरदार १२३०
प्रयत्न चालू ठेवण्यात येत आहेत. रबी लागवडीखाली अधिक क्षेत्र आणणे, नव्याने १३०५
उभारण्यात आलेल्या पाटबंधारे योजनांपासून मोफत पाणीपुरवठा करणे, मोफत १३८०
जंतुनाशके पुरविणे व रासायनिक खतांचा अर्थसाहाय्यित स्वरूपात पुरवठा करणे या १४५६
बाबींकडे विशेष लक्ष देणे हे या वर्षीच्या कार्यक्रमाचे वैशिष्टच आहे. १५२३

या वर्षापासून भात व भुईमुगाच्या उत्पादनावर सर्वतोपरी लक्ष केंद्रित करण्या- १५९८
साठी विशेष उन्हाळी मोहीम सुरू करण्यात आली आहे. राज्याच्या किनारपट्टीच्या १६७२
जिल्ह्यांत उन्हाळी भातशेती करण्यासाठी उत्तेजन देण्यात येत आहे. १७३१

शासनाने विशिष्ट क्षेत्रांत सर्वंकष कार्यक्रम सुरू करण्याचा निर्णय घेतलेला १८०४
असून त्याप्रमाणे निवडक क्षेत्रांत फळफळावळीचे उत्पादन करणे, निर्यातीच्या प्रयोजना- १८८३
साठी फळफळावळीच्या उत्पादनात वाढ करणे आणि रोगमुक्त बटाट्याच्या बियांचे १९५४
उत्पादन करणे यांसाठी विशेष योजना शासनाने हाती घेतल्या आहेत. या योजना २०३०
यशस्वी होतील याबद्दल शासनाला तिळमात्र संदेह वाटत नाही. २०८५

पुढील मजकूर टंकलिखित करा :

आघात

वाल्मिकीने शतकोटी रामायण लिहिले. तिन्ही लोकांत त्या रामायणावर हक्क ६९
सांगण्याच्या निमित्ताने भांडण लागले. ते भांडण तोडण्याचे काम शंकरावर सोपविण्यात १५१
आले. शंकर भगवानाने त्या रामायणाची तिन्ही लोकांमध्ये सारखी सारखी वाटणी २२६
करण्यास सुरुवात केली. तेहतीस कोटीनंतर तेहतीस लक्ष याप्रमाणे समान वाटणी २९८
करता करता एक श्लोक शिल्लक राहिला. रामायणातील अनुष्टुभ छंदाचा तो श्लोक ३७२
बत्तीस अक्षरांचा होता. दहा दहा अक्षरांची वाटणी केल्यानंतर दोन अक्षरे राहिली, ४४८
तेव्हा भगवान शंकर म्हणाले, "मी तुमचे भांडण मिटवण्याची कामगिरी केली ५१३
त्याबद्दलचा मेहनताना मला मिळाला पाहिजे. उरलेल्या दोन अक्षरांची समान विभागणी- ५९७
ही होत नाही तेव्हा ही दोन अक्षरे मी पत्करतो". कोणती ती अक्षरे ? "राम" ६७१
नाम. सबंध रामायण त्यांनी तिन्ही लोकांत वाटून दिले आणि त्या सगळ्यांचे ७४६
सार दोन अक्षरांत ग्रहण केले. ७७५

तुलसीदासांनी रामायणामध्ये लक्ष्मणाचे वर्णन केले आहे. आपण झेंड्याचे ८४६
गीत गातो. "झंडा ऊंचा रहे हमारा". ती उपमा तुलसीदासजींनी घेतली आहे. ९२४
त्यांनी म्हटले आहे की, प्रभु रामचंद्रांच्या यशाची पताका, त्यांच्या कीर्तीचा झेंडा, १००१
जो एवढा उंच राहिला आहे त्याचे कारण लक्ष्मणाच्या उंच दंडाचा त्या झेंड्याला १०७३
आधार होता हे आहे. आपण सगळे "झंडा ऊंचा रहे" म्हणतो. "डंडा ऊंचा रहे" ११६०
म्हणत नाही. पण दंडा जर उंच राहिला नाही तर झेंडा कुठून राहणार ? पण १२३२
दंडाची खुबीच ही की तो लाठ उभा राहून झेंड्याला उंची देतो, पण त्याचे नाव १३०७
कोणी घेत नाही. १३२४

तुलसीदासासारखा मनोज्ञ व रसिक मनुष्यच त्या काठीची आठवण ठेवतो. १३८९
रामचंद्राच्या यशात आपले यश लोपले गेले यातच लक्ष्मणाला गोडी वाटली. ते १४६०
जर रामचंद्राच्या यशाहून अलग राहिले असते तर लक्ष्मणाला गोडी वाटली नसती. १५२८

कोणत्याही क्रांतिकारी विचाराचा प्रचार सत्तेच्या द्वारा झालेला नाही. सत्ता १६०१
फार झाले तर लोकांना थोडे सुख देऊ शकते. याहून अधिक आशा सत्तेपासून राखता १६८४
कामा नये. आपल्या देशात भगवान बुद्धाने क्रांतिकारी विचार लोकांना दिले होते. १७६५
पण त्या कामी त्यांना राजसत्तेचा उपयोग नव्हे, तर त्याग करावा लागला होता. १८३६
गांधीजींनीदेखील विचाराच्या प्रचारासाठी राज्य इच्छिले नव्हते. त्यांनी तर स्वराज्य १९१३
इच्छिले होते. स्वराज्य म्हणजे जिथे दरेकजण स्वतःचा राजा असतो, म्हणजे जिथे १९८८
राजसत्ता क्षीण होते, सत्तेला जिथे अवकाशच राहात नाही, असे स्वराज्य तर २०५६
आपल्याला अजून मिळवावयाचे आहे. २०८६

—आचार्य विनोबा भावे

## अभ्यास ६७

**पुढील मजकूर टंकलिखित करा :** **आघात**

शासन व्यवहारातील मराठीचा विचार केला तर लोकशाहीत अभिप्रेत असलेल्या ७२
व्यापक अर्थाइतकीच या क्षेत्रातील तिची व्याप्ती राहील. आजची प्रशासनिक भाषा ही केवळ १४७
सामान्य स्वरूपाच्या कार्यालयीन पत्रव्यवहारापुरती व टिप्पणीलेखनापुरती किंवा जनतेसाठी २२६
काढण्यात येणाऱ्या सूचना व प्रसिद्धीपत्रके यांच्यापुरतीच मर्यादित राहिलेली नाही. सरकारी ३०८
कार्यालयात धूळ खात पडून राहणाऱ्या दप्तराबाहेर तिचा उपयोग होणार नसल्यामुळे ३८५
तिचा विकास तो काय करायचा, ही कल्पना आज चुकीची ठरेल. पूर्वी जेव्हा शासनाचे ४६०
संपर्कक्षेत्र इतके व्यापक नव्हते त्या वेळीही शासनव्यवहाराच्या भाषेचा व्याप सामान्य व्यव- ५४१
हाराच्या भाषेहून अधिक होता. आजच्या घटकेस लोककल्याणकारी राज्याच्या आदर्शामुळे ६२३
शासनाशी संबंधित विषयांचा आटोप इतका वाढता आहे की लोकजीवनाचे बहुधा एकही ७०२
क्षेत्र त्यातून सुटले नाही. त्यामुळे प्रशासनिक भाषेचा विकास या सर्व विषयांना आवश्यक ७८५
अशा भाषेच्या विकासाशी समानार्थक झाला आहे. एक साहित्याचे क्षेत्र सोडले तर इतर ८६६
अनेक क्षेत्रांत मराठी भाषा ही आजवर मागेच पडली होती. या सर्व क्षेत्रांतील इंग्रजीच्या ९४९
वापरामुळे व वर्चस्वामुळे मराठीच्या प्रगतीस पायबंद बसला होता. माध्यमिक शिक्षणाचा १०२७
स्तर वगळता सारे उच्च शिक्षण इंग्रजीतून मिळत होते. प्रशासनातही तालुका व जिल्हा ११०४
स्तरांवर थोडाबहुत मराठीचा वापर असला तरी इतर सर्व ठिकाणी इंग्रजीतूनच कामकाज ११७९
होत होते. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तर प्रशासनिक मराठीला केवढी मोठी मजल १२५६
गाठावयाची आहे याची कल्पना येईल. वर सांगितल्याप्रमाणे प्रशासनाच्या कक्षेत सर्वच १३३१
विषय येत असल्यामुळे त्या प्रत्येक विषयाची परिभाषा तयार होईपर्यंत मराठी ही राज्य- १४१२
कारभाराची भाषा होऊ नये, असे कोणी म्हणणार नाही. प्रशासनाच्या दृष्टीने या विषयांचा १५०१
जेवढा संबंध येतो तेवढ्यापुरता तरी मराठीतील शब्दसंग्रह तयार करणे जरूर आहे. १५७८
राज्यव्यवहारात मराठीला लवकर स्थान मिळायचे असेल तर अशी परिभाषा त्या त्या १६४९
विषयाच्या अनुरोधाने स्वाभाविक क्रमानुसार तयार होईपर्यंत अनिश्चित काळ थांबून १७२७
चालणार नाही. त्यासाठी धडाडीने पुढे जावे लागेल. इंग्रजीसारख्या पुढारलेल्या भाषेचा १८१०
विकास पाश्चात्त्य देशांतील औद्योगिक क्रांतीच्या आणि शास्त्रीय व तांत्रिक प्रगतीच्या १८९०
बरोबरीने पावले टाकून सावकाश झाला आहे. हा विकास अनेक विषयांवरील सतत १९६३
ग्रंथनिर्मितीद्वारे नैसर्गिक क्रमाने झाला आहे. तिच्या मानाने अप्रगत असलेल्या मराठीला २०४७
तिची जागा घ्यायची तर तिला गेल्या काही शतकांच्या विकासाचा टप्पा त्वरेने गाठावा २१२१
लागेल. ज्या कामाला इंग्रजीला शतके लागली ते काम मराठीसारख्या विकासाची २१८९
निकड असलेल्या भाषांना काही दशकांतच तडीला न्यायचे आहे. त्यासाठी शब्द २२५९

आघात

भाषेतून कोशात येण्याऐवजी, तो कोशातून भाषेत आणण्याच्या भाषाशास्त्र दृष्ट्या २३४१
काहीशा अस्वाभाविक प्रक्रियेचा अवलंब करावा लागणार आहे. पण संक्रमण काळातील २४१७
प्रगतीचा वेग टिकवायचा असेल तर ठराविक चाकोरी सोडून नव्या वाटा शोधाव्या २४८९
लागतात, नवे प्रयोग करून पाहावे लागतात. विकासाच्या इतर क्षेत्रांत आपण असे २५६२
प्रयोग करीतच आहोत. शासनव्यवहारासाठी आवश्यक तो शब्दसंग्रह व परिभाषा तयार २६३९
करण्याचा प्रयत्न हा असाच एक प्रयोग आहे, असा दृष्टिकोन याबाबत ठेवणे आवश्यक २७१२
आहे. पण या संक्रमण काळाचा एक विशेष असा की प्रगती इच्छिणारा समाजच २८८१
प्रगतीचा वेग सांभाळू शकत नाही. तो रूढीला व परंपरांना चिकटून राहतो. भाषिक २९६१
प्रयोगशीलतेच्या बाबतीत तर हे परंपरानुसारित्व विशेषच अनुभवास येते. पण नव्या व ३०४१
निकडीच्या गरजा भागविण्याकरिता अशा प्रयोगशीलतेला अवसर दिला पाहिजे, आणि ३११३
त्याकरिता लोकांची मने अनुकूल करून घेतली पाहिजेत. ३२६१

## सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन

### मराठी लघुलेखन व टंकलेखन परीक्षा एतदर्थ मंडळ

मराठी टंकलेखन परीक्षेच्या प्रश्नपत्रिकांचे नमुने

मराठी टंकलेखन परीक्षा, १९६६
शुक्रवार, दिनांक ७ ऑक्टोबर
**मराठी टंकलेखन—विभाग १**
(वेळ—१० मिनिटे)

**सूचना.**—(१) स्पर्शसमता, नीटनेटकेपणा व योग्य अंतरक्षेपण यांसाठी १० गुण राखून ठेवले आहेत.

(२) उत्तरपत्रिका ज्या टंकलेखन यंत्रावर टंकलिखित केली असेल ते तयार करणाऱ्या कंपनीचे नाव उत्तरपत्रिकेच्या आरंभी लिहावे.

पुढील मजकूर द्विपंक्ती अंतराने टंकलिखित करा : गुण ९०

आज आपण विकट परिस्थितीतून जात आहोत. विशेषत: आपली राष्ट्रीय अर्थव्यवस्था अडचणीत सापडली आहे. पंचवार्षिक योजनांच्या द्वारे आपण कृषी, पाटबंधारे, विद्युतनिर्मिती आणि उद्योगधंदे या क्षेत्रांत भरीव कामगिरी केली आहे. या आणि इतर क्षेत्रांत आपण प्रयत्नांची पराकाष्ठा केली असली तरी, अजून बरीच कामगिरी आपणास पार पाडावयाची आहे. तरीसुद्धा स्वातंत्र्यानंतर अवघ्या १८ वर्षांत आपण केलेली कामगिरी खरोखरच नेत्रदीपक आहे, असे म्हणावे लागेल. अशा रीतीने आपण उल्लेखनीय कामगिरी केली असली तरी आपल्या गरजांना पुरून उरेल इतके उत्पादन निरनिराळ्या कारणांमुळे आपणास करता येत नाही असे दिसून आले आहे. परिणामी वस्तूंच्या किमती वाढत आहेत आणि सामान्य माणसाला अडचणीच्या परिस्थितीला तोंड द्यावे लागत आहे. तेव्हा राष्ट्र या नात्याने आपण या आव्हानाला शिस्तीने तोंड दिले पाहिजे. यावर सर्वांत जास्त परिणामकारक असा एकच उपाय आहे, तो म्हणजे कृषी व औद्योगिक क्षेत्रात जास्त उत्पादन. कोणत्याही तऱ्हेने वस्तूंची साठेबाजी होणार नाही आणि कोणत्याही तऱ्हेने गिऱ्हाइकांची पिळवणूक होणार नाही याविषयी मोठी जबाबदारी आपल्या उद्योगपतींवर व व्यापाऱ्यांवर येऊन पडते. त्या दृष्टीने त्यांनी तशी हमी घेतली पाहिजे.

किमती रोखण्यासाठी आम्ही विविध उपाययोजना अमलात आणीत आहोत. राज्याच्या निरनिराळ्या भागांत ग्राहक भांडारे काढण्याचा निर्णयसुद्धा आम्ही घेतला आहे. या प्रयत्नांत आपण दृढनिश्चयपूर्वक यशस्वी होऊ याविषयी तिळमात्र संदेह नाही. काही दिवसांपूर्वी आपल्या राज्यात पावसास उशिरा सुरुवात झाल्यामुळे आपण काहीसे चिंतातुर झालो होतो. सुदैवाने आता पावसास प्रारंभ झाला आहे आणि त्यामुळे या वर्षी अन्नधान्य परिस्थिती आम्हाला अनुकूल राहील अशी अपेक्षा आहे.

सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन

मराठी लघुलेखन व टंकलेखन परीक्षा एतदर्थ मंडळ

मराठी टंकलेखन परीक्षा

१९६६

शुक्रवार, दिनांक ७ ऑक्टोबर

**मराठी टंकलेखन**—विभाग २

(वेळ—९५ मिनिटे)

**सूचना.**—(१) स्पर्शसमता, नीटनेटकेपणा व योग्य अंतरक्षेपण यांसाठी १० गुण राखून ठेवले आहेत.

(२) उत्तरपत्रिका ज्या टंकलेखन यंत्रावर टंकलिखित केली असेल ते तयार करणाऱ्या कंपनीचे नाव उत्तरपत्रिकेच्या आरंभी लिहावे.

गुण

१. पुढे दिलेला मजकूर एका कर्ब-प्रतीसह योग्य पद्धतीने टंकलिखित करा : २०

**सन १९६६ चे विधानसभा विधेयक क्रमांक २३**

**मुंबई कुळवहिवाट व शेतजमीन (विदर्भ विभाग) अधिनियम, १९५८ यात आणखी सुधारणा करण्याबाबत विधेयक**

ज्याअर्थी, मुंबई कुळवहिवाट व शेतजमीन (विदर्भ विभाग) अधिनियम, १९५८ यात यापुढे दिलेल्या कारणासाठी आणखी सुधारणा करणे इष्ट आहे;

त्याअर्थी, भारतीय गणराज्याच्या सतराव्या वर्षी याद्वारे पुढीलप्रमाणे अधिनियम करण्यात येत आहे :—

१. या अधिनियमास मुंबई कुळवहिवाट व शेतजमीन (विदर्भ विभाग) (सुधारणा) अधिनियम, १९६६ असे म्हणावे. संक्षिप्त नाव.

२. मुंबई कुळवहिवाट व शेतजमीन (विदर्भ विभाग) अधिनियम, १९५८ (ज्याचा यात यापुढे "मुख्य अधिनियम" असा उल्लेख करण्यात आला आहे) याच्या कलम ३८, पोट-कलम (७) मध्ये "ज्या भू-धृतिधारकाने कोणतीही जमीन, १ ऑगस्ट १९५३ नंतर हस्तांतर करून किंवा विभागणी करून, संपादन केली असेल" या मजकुरानंतर, "किंवा उपरोक्त तारखेपूर्वी ज्याचा जमिनीत हक्क होता, परंतु अशा तारखेनंतर ज्याने जमिनीची विभागणी केली असेल" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १९५८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ९९ याच्या कलम ३८ ची सुधारणा.

[उलटून पाहा

२. पुढे दिलेला ताळेबंद एका कर्ब-प्रतीमध्ये योग्य पद्धतीने टंकलिखित करा : गुण ३०

**महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचा ३१ मार्च १९६५ रोजी संपणाऱ्या वर्षाचा ताळेबंद**

| भांडवल व देणी | रुपये पैसे | रुपये पैसे | मालमत्ता | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|---|---|---|
| १. अधिकृत भांडवल | | १०,००,०००.०० | १. स्थावर मालमत्ता. | | १५,००,०००.०० |
| २. प्राप्त भांडवल | | ५,००,०००.०० | २. विविध गुंतवणूक— | | |
| ३. राखीव निधी | | १०,८५,९६५.०० | (१) सरकारी कर्जरोखे. | १०,५०,०००.०० | |
| | | | (२) विविध देणेकरी. | ५,४०,३००.०० | |
| ४. रिझर्व बँकेकडून घेतलेले कर्ज. | | ५,५०,०००.०० | (३) रिझर्व बँकेत. | ६,२५,५००.०० | |
| ५. इतर ठेवी | | १०,७५०.०० | (४) अल्प मुदतीच्या ठेवी. | ३,००,१००.०० | |
| ६. विविध ठेवी— | | | | | |
| (१) भांडवली ठेवी. | २,३०,०००.०० | | (५) सरकारी दीर्घ मुदतीच्या ठेवी. | ४,०५,०००.०० | |
| | | | | | ३३,२०,९००.०० |
| (२) तातपुरत्या ठेवी. | ५,४०,३००.०० | | | | |
| | | ७,७०,३००.०० | ३. हाती असलेली रोकड— | | |
| ७. सरकारी कर्ज | | ५,६०,०००.०० | (१) मुख्य कार्यालय. | ५,००,०००.०० | |
| ८. कर्मचारी भविष्य निधी. | | ५,००,०००.०० | (२) निरनिराळ्या शाखांकडे असलेली रोकड. | २,००,०००.०० | |
| ९. निव्वळ नफा | | १,०३,८८१.०० | | | ७,००,०००.०० |
| एकूण .. | | ५५,२०,९००.०० | एकूण .. | | ५५,२०,९००.०० |

गुण

३. पुढील तक्ता एका कर्ब-प्रतीसह योग्य पद्धतीने टंकलिखित करा व रकान्यांच्या ओळी टंकलेखन यंत्राच्या साहाय्याने अथवा शाईने वा पेन्सिलीने आखा : २०

**महाराष्ट्र राज्याच्या निरनिराळ्या जिल्ह्यांतील सन १९५७–५८ ते १९६०–६१ पर्यंत झालेल्या जन्मांची संख्या दर्शविणारा तक्ता**

| जिल्ह्याचे नाव<br>१ | १९५७-५८<br>२ | १९५८-५९<br>३ | १९५९-६०<br>४ | १९६०-६१<br>५ |
|---|---|---|---|---|
| नागपूर .. | १,४५,२५० | १,५०,३६० | १,५५,६०३ | १,६०,६३० |
| वर्धा .. | १,१०,४५० | १,१५,५०० | १,२०,५५० | १,२५,७०० |
| चांदा .. | १,२५,२०० | १,३०,३०० | १,३५,६०० | १,४०,००० |
| भंडारा .. | १,७५,३०० | १,८०,७५० | १,९०,६५० | १,९५,७०० |
| अमरावती .. | २,००,५०० | २,१०,५५० | २,१५,६०० | २,२०,६५० |
| बुलढाणा .. | १,१५,७५० | १,२०,८०० | १,२५,८५० | १,३०,९०० |
| अकोला .. | १,९०,७०० | १,९५,२५० | १,९६,८०० | १,९९,६६३ |
| यवतमाळ .. | १,७५,००० | १,८०,९९० | १,८५,५६० | १,८०,१७५ |
| औरंगाबाद .. | २,२५,७५० | २,५०,८०० | २,७५,१७५ | २,९०,४५० |
| परभणी .. | १,६०,१०० | १,६६,५०० | १,७०,६५१ | १,८०,९६० |
| उस्मानाबाद .. | १,८०,२५० | १,८५,६५० | १,९०,५५५ | १,९५,७५८ |
| नांदेड .. | १,५०,६०१ | १,७५,८०२ | १,८०,९०९ | १,९०,९६० |
| बीड .. | १,९०,५५० | १,९५,९६० | २,१०,५०५ | २,१५,८५० |
| सोलापूर .. | २,२५,७५० | २,३०,७५० | २,५०,८०२ | २,७५,६६० |
| सातारा .. | ९९,८८८ | १,१०,११९ | १,२०,२५६ | १,३०,६५२ |

## सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन
## मराठी लघुलेखन व टंकलेखन परीक्षा एतदर्थ मंडळ

मराठी टंकलेखन परीक्षा

१९६६

शनिवार, दिनांक ८ ऑक्टोबर

**मराठी टंकलेखन**—विभाग १

(वेळ—१० मिनिटे)

**सूचना.**—(१) स्पर्शसमता, नीटनेटकेपणा व योग्य अंतरक्षेपण यांसाठी १० गुण राखून ठेवले आहेत.

(२) उत्तरपत्रिका ज्या टंकलेखन यंत्रावर टंकलिखित केली असेल ते तयार करणाऱ्या कंपनीचे नाव उत्तरपत्रिकेच्या आरंभी लिहावे.

पुढील मजकूर द्विपंक्ती अंतराने टंकलिखित करा : गुण ९०

शासनव्यवहार हा सुसंस्कृत मानवसमाजाच्या अनेकरूप व्यवहाराचाच एक भाग आहे. इतर अनेक कामांसाठी भाषेचा जसा आपण उपयोग करतो तसाच तो प्रशासनाच्या कामासाठीही करतो. समाजव्यवहाराची अनेक अंगे व रूपे असतानाही तो व्यवहार करणारा समाज एकच आहे असा प्रत्यय आपणाला येत असतो. त्याचप्रमाणे या अनेकरूप व्यवहारासाठी वापरण्यात येणारी भाषा एकच असावी अशी समजूत सामान्यतः आपण मनात वागवीत असतो. या समजुतीनेच, राज्यकारभारासाठी वापरण्यात येणारी भाषा ही तदितर व्यवहाराच्या भाषेहून वेगळी नसावी, अशी आपली सर्वसाधारणपणे कल्पना झालेली असते. पण ही कल्पना भाषेच्या वास्तव स्वरूपास धरून आहे काय? शासन व्यवहारातूनच नव्हे, तर इतर अनेक ठिकाणी वापरात येणारी भाषा ही एकच असते की, व्यवहारागणिक तिच्या रूपात थोडाबहुत तरी बदल घडतो? एका व्यवहारासाठी उपयोगी पडणारी भाषा त्याच स्वरूपात दुसऱ्या व्यवहारासाठी वापरता येते काय? या व अशाच इतर प्रश्नांचा तात्त्विक आणि व्यावहारिक दृष्टीतून नीट विचार केल्यास सामान्य व्यवहारातील मराठी भाषा संपूर्णपणे शासनव्यवहारासाठी उपयोगी पडेल किंवा नाही हे ठरविता यावे.

भाषा ही मानवी जीवनाचे एक अपरिहार्य अंग आहे. भाषेच्या द्वारे परस्पर विचारविनिमय शक्य होत असल्यामुळे समाजातील निरनिराळे लोक एकत्र येऊ शकतात. कोणताही समाज सुस्थिर राहू शकतो व प्रगती करू शकतो तो भाषेचा आश्रय घेऊनच. भाषेशिवाय समाजाची कल्पना करणे असंभवनीय आहे. सर्व तऱ्हेच्या सामाजिक संबंधांची उभारणी भाषेच्या माध्यमाचा उपयोग करूनच होऊ शकली आहे. कुटुंब, शेजारधर्म, व्यवसाय, राष्ट्रधर्म असे अनेक संबंध मानवी समाजात निर्माण झाले व टिकून राहिले ते भाषेच्या आधारावरच. भाषेचे साधन उपयोगात आणून मनुष्य आपले सर्व व्यवहार चालवीत असतो.

## सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन

### मराठी लघुलेखन व टंकलेखन परीक्षा एतदर्थ मंडळ

मराठी टंकलेखन परीक्षा

**१९६६**

शनिवार, दिनांक ८ ऑक्टोबर

**मराठी टंकलेखन**—विभाग २

(वेळ—९५ मिनिटे)

**सूचना.**—(१) स्पर्शसमता, नीटनेटकेपणा व योग्य अंतरक्षेपण यांसाठी १० गुण राखून ठेवले आहेत.

(२) उत्तरपत्रिका ज्या टंकलेखन यंत्रावर टंकलिखित केली असेल ते तयार करणाऱ्या कंपनीचे नाव उत्तरपत्रिकेच्या आरंभी लिहावे.

गुण

१. पुढे दिलेला मजकूर एका कर्ब-प्रतीसह योग्य पद्धतीने टंकलिखित करा : २०

**सन १९६६ चे महाराष्ट्र विधानसभा विधेयक क्रमांक २९**

**मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ यांत आणखी सुधारणा करण्यासाठी विधेयक.**

**ज्याअर्थी, यात यापुढे दिलेल्या प्रयोजनासाठी** मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, **१९५८ यात आणखी** सुधारणा **करणे इष्ट आहे;**

**त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या सतराव्या **वर्षी यांद्वारे** पुढीलप्रमाणे **अधिनियम करण्यात** येत आहे :—

१. या अधिनियमास मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अधिनियम, १९६६, असे म्हणावे. संक्षिप्त नाव.

२. मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८, यामध्ये कलम ३२-अ ऐवजी पुढील कलम दाखल करण्यात येईल :— सन १९५८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ३२-अ ची सुधारणा.

"३२-अ. (१) सरपंच व उप सरपंच यांना त्यांच्या पदावधीमध्ये मानधन म्हणून अनुक्रमे ५० रुपये व ३० रुपये देण्यात यावेत;

(२) पंचायतीच्या सदस्यांना (सरपंच व उप सरपंच धरून) पंचायतीच्या प्रत्येक सभेस उपस्थित असल्यावद्दल २ रुपये दैनिक भत्ता देण्यात येईल. महसुली गावांच्या गटासाठी प्रस्थापित करण्यात आलेल्या पंचायतीच्या बाबतीत, ज्या महसुली गावात उक्त सभा घेण्यात आली असेल अशा गावाबाहेर राहणाऱ्या सदस्यांना अशा सभेस उपस्थित राहण्यावद्दल दैनिक भत्त्याशिवाय १ रुपया प्रवासभत्ता मिळण्याचाही हक्क असेल.

[ उलटून पाहा

२. पुढे दिलेला ताळेबंद एका कर्ब-प्रतीसह योग्य पद्धतीने टंकलिखित करा : गुण ३०

## महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ

### ३१ मार्च १९६५ पर्यंतचा ताळेबंद

| देणी | रुपये | रुपये | मालमत्ता | रुपये | रुपये |
|---|---|---|---|---|---|
| (अ) राज्य शासनास परत करावयाच्या रकमा— | | | १. कायम मालमत्ता | | ६,५३,२६० |
| (एक) रोख रकमेचे कर्ज. | ६६,८०,००० | | २. वसाहतींचा विकास. | | ९२,१३,३७७ |
| (दोन) औद्योगिक विकास महामंडळाचा खर्च. | २५,४३,६४५ | | ३. इतर योजनांचा खर्च. | | ५६,६१,५६४ |
| | | ९२,२३,६४५ | ४. हाती आलेला माल. | | १४,९७,२४२ |
| महाराष्ट्राच्या महालेखापालांनी नोंद केलेला खर्च— | | | ५. आगाऊ रकमा | | १६,१४,२९४ |
| १९६३-६४ | ६१,३५,७७८ | | ६. रोख रक्कम— | | |
| १९६४-६५ | ६०,५०,५८० | | | | |
| | | १,२१,८६,३५८ | अल्प मुदतीच्या ठेवी. | ५९,०४,५९३ | |
| इतर देणी | | १,३६,७३४ | बँकेतील रोख रक्कम. | २५,१०,००० | |
| (ब) लोकांकडून घेतलेली कर्जे. | | ५०,२०,००० | | | ८४,१४,५९३ |
| (क) संकीर्ण देणे रकमा. | | २६,१०,००० | ७. राज्य सरकारकडून येणे असलेल्या रकमा. | | ५०,२०,००० |
| (ड) राज्य शासनाकरिता मिळालेल्या रकमा— | | | ८. वसाहत विकास | १०,८३,७१३ | |
| पाणीपुरवठा योजना | ६०,००,००० | | | | |
| **वजा**—विकास खर्च | ३०,२७,८२६ | | **वजा**—अनामत रकमा. | ९,८२,१३२ | |
| | | २९,७२,१७४ | | | १,०१,५८१ |
| एकूण .. | | ३,२१,७५,९११ | एकूण ... | | ३,२१,७५,९११ |

गुण

३. पुढील तक्ता एका कर्ब-प्रतीसह योग्य पद्धतीने टंकलिखित करा व रकान्यांच्या ओळी टंकलेखन यंत्राच्या साहाय्याने अथवा शाईने वा पेन्सिलीने आखा : २०

**महसुली लेखाशीर्षावरील खर्चाचे शीर्षवार विवरणपत्र**

| खर्चाची शीर्षे<br>१ | लेखा<br>१९६३–६४<br>२ | अर्थसंकल्प<br>१९६४–६५<br>३ | सुधारलेले अंदाज<br>१९६४–६५<br>४ | अर्थसंकल्प<br>१९६५–६६<br>५ |
|---|---|---|---|---|
| | रुपये | रुपये | रुपये | रुपये |
| जमीन महसूल .. | ३१,०६,२९८ | ३७,६५,२९० | ४७,३०,५०० | ३२,८६,००० |
| वाहनांवरील कर .. | २०,९५,९२७ | ४१,०१,१०५ | ८९,९६,००० | ९६,१२,५०६ |
| विक्रीकर .. | ४९,६४,७९७ | ४७,६०,८०० | ४८,७५,०७० | ६०,८२,२०० |
| इतर कर व शुल्क .. | ५३,६४,७१० | ९६,५७,००० | ९२,५८,२७५ | ९२,९६,००० |
| मुद्रांक .. | ९,५७,५५९ | १२,७१,४०० | ११,१०,५०० | १०,४३,००० |
| नोंदणी फी .. | २०,०९,८९६ | २२,५५,९७० | २६,५५,९६० | २४,०४,९८८ |
| सामान्य प्रशासन .. | ५०,५८,०८२ | ५३,३३,००० | ५५,१२,५८७ | २४,१९,३०० |
| न्यायदान .. | ३४,२९,०७० | ४६,२५,१७० | ४८,८७,००० | ६६,३७,३५० |
| तुरुंग .. | ३०,४६,९०१ | २७,२२,००० | ४८,४८,११२ | ३०,८०,००० |
| पोलीस .. | २२,५३,९६७ | ८७,३५,४७८ | ६५,१६,००० | १६,१२,१०० |
| पुरवठा व विनियोग .. | १०,५०० | ११,६५६ | १२,८०० | १५,४०० |
| संकीर्ण विभाग .. | ३०,६०,६७८ | ३१,४०,९०० | ५४,६५,७८९ | ६७,९०,१३५ |
| शिक्षण .. | १२,१३,५०० | ४०,१२,५६५ | २०,३७,८९० | २१,५४,६०० |
| आरोग्य .. | ४५,६०,७०० | ४८,६५,८९० | ५१,६५,८७० | ७४,५१,७०० |

## सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन
### मराठी लघुलेखन व टंकलेखन परीक्षा एतदर्थ मंडळ

मराठी टंकलेखन परीक्षा, १९९६
रविवार, दिनांक ९ ऑक्टोबर
**मराठी टंकलेखन**—विभाग १
(वेळ—१० मिनिटे)

**सूचना.**—(१) स्पर्शसमता, नीटनेटकेपणा व योग्य अंतरक्षेपण यांसाठी १० गुण राखून ठेवले आहेत.

(२) उत्तरपत्रिका ज्या टंकलेखन यंत्रावर टंकलिखित केली असेल ते तयार करणाऱ्या कंपनीचे नाव उत्तरपत्रिकेच्या आरंभी लिहावे.

पुढील मजकूर द्विपंक्ती अंतराने टंकलिखित करा : गुण ९०

ऑगस्ट महिना आपल्या देशाच्या इतिहासात अत्यंत महत्त्वाचा आहे. या महिन्याच्या १५ तारखेला भारताने गुलामीचा साखळदंड तोडला, भारत स्वतंत्र झाला आणि याच महिन्यात स्वतंत्र भारताचे तिरंगी निशाण दिल्लीच्या लाल किल्ल्यावर मोठ्या डौलाने फडकू लागले. दिवंगत पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरू हे आमच्या लोकशाही राष्ट्राचे पहिले पंतप्रधान झाले. लढाईशिवाय आणि रक्ताचा एकही थेंब न सांडता आपण हे स्वातंत्र्य मिळविले आहे. हा दिवस उगवण्यासाठी असंख्य लहानथोर भारतीयांनी बलिदान केले. तिरंगी झेंड्याच्या रक्षणासाठी छातीचा कोट केला. असंख्य तरुणांनी आपले जीवनपुष्प भारतमातेच्या चरणी अर्पण केले. या सर्वांच्या स्मृतीचा हा महिना आहे. भारतमातेला गुलामीतून मुक्त करणाऱ्या भारतमातेच्या या सुपुत्रांना आजच्या या शुभदिनी आपण आदराने व कृतज्ञतेने श्रद्धांजली वाहू या. आता आपण या स्वतंत्र देशाचे स्वतंत्र नागरिक आहोत. म्हणून पूज्य राष्ट्रपिता गांधीजींच्या इच्छेनुसार या स्वराज्याचे सुराज्य आणि रामराज्य करण्यास आपण तनमनधनपूर्वक प्रयत्न केले पाहिजेत.

स्वराज्य मिळविण्यास आपणास अनंत कष्ट पडले. पण त्याहून अधिक कष्ट ते टिकविण्यास पडणार आहेत. स्वराज्याने आज पस्तिसाव्या वर्षात पदार्पण केले आहे. या चौतीस वर्षांच्या काळात आपण अनेक योजना केल्या, कोट्यवधी रुपये खर्च केले व बरीच प्रगतीही केली. पण भारताचा आत्मा असलेली खेडी मात्र अजूनही तशीच दरिद्री आहेत. भारतमातेचे हे भूमिपुत्र अर्धपोटी व अर्धनग्न असून आपल्या चंद्रमौळी घरात कसेबसे जीवन जगत आहेत. भारताचे हे चित्र बदलण्यास आपण कटिबद्ध झालो आहोत. आपला देश मोठा आहे, आपल्या समस्या मोठ्या आहेत. पण आपल्या जनतेची शक्तीदेखील अफाट आहे. या अफाट शक्तीचे विराट स्वरूप जनतेने दाखवावे अशी वेळ आज आली आहे.

सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन
मराठी लघुलेखन व टंकलेखन परीक्षा [illegible] मंडळ

मराठी टंकलेखन परीक्षा, १९६६
रविवार, दिनांक ९ ऑक्टोबर
मराठी टंकलेखन—विभाग २
(वेळ—९५ मिनिटे)

**सूचना.**—(१) स्पर्शसमता, नीटनेटकेपणा व योग्य अंतरक्षेपण यांसाठी १० गुण राखून ठेवले आहेत.

(२) उत्तरपत्रिका ज्या टंकलेखन यंत्रावर टंकलिखित केली असेल ते तयार करणाऱ्या कंपनीचे नाव उत्तरपत्रिकेच्या आरंभी लिहावे.

गुण

१. पुढे दिलेला मजकूर एका कर्ब-प्रतीसह योग्य पद्धतीने टंकलिखित करा : २०

**सन १९६६ चे विधानसभा विधेयक क्रमांक २०**

**मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ यात आणखी सुधारणा करण्याबाबत विधेयक.**

ज्याअर्थी, यापुढे दिलेल्या कारणासाठी मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ यात आणखी सुधारणा करणे इष्ट आहे;

त्याअर्थी, भारतीय गणराज्याच्या सतराव्या वर्षी याद्वारे पुढीलप्रमाणे अधिनियम करण्यात येत आहे :—

१. या अधिनियमास मुंबई विक्रीकर (सुधारणा) अधिनियम, १९६६ असे म्हणावे. — संक्षिप्त नाव.

२. मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ (ज्याचा यापुढे "मुख्य अधिनियम" असा उल्लेख करण्यात आला आहे) याच्या कलम ११ मध्ये शेवटी "रुपयास दोन पैसे या दराने" या मजकुराऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

"जर अशी विक्री खंड (१) किंवा (२) यात मोडत नसेल तर, रुपयास दोन पैसे या दराने" — सन १९५९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५१ यातील कलम ११ ची सुधारणा.

३. मुख्य अधिनियमाच्या अनुसूची 'ब' मध्ये,—

(अ) अनुसूचीच्या दोन्ही भागांमध्ये "दोन पैसे" हा मजकूर जेथे जेथे येईल तेथे तेथे त्याऐवजी "तीन पैसे" हा मजकूर दाखल करण्यात येईल; आणि

(ब) या अनुसूचीच्या भाग दोनमधील नोंद क्रमांक २ ही वगळण्यात येईल. — सन १९५९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५१ यातील अनुसूची 'ब' ची सुधारणा.

[उलटून पाहा

गुण ३०

२. पुढे दिलेला ताळेबंद एका कर्ब-प्रतीसह योग्य पद्धतीने टंकलिखित करा :

**संत मीराबाई माध्यमिक कन्याशाळा, गोरेगाव**

**३१ मार्च १९६६ रोजी संपणाऱ्या वर्षाचे वित्तविवरण**

| जमा | रुपये पैसे | रुपये पैसे | खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|---|---|---|
| १. मागील वर्षाची शिल्लक. | | २,५१२.०० | १. पगार व भत्ते— | | |
| | | | (१) शिक्षकांचे पगार. | ५१,२००.०० | |
| २. शुल्क— | | | (२) शिक्षकांचे भत्ते. | १०,४२०.०० | |
| (१) शिक्षण शुल्क. | ५१,२००.०० | | (३) नोकरांचे पगार. | ५,३१०.०० | |
| (२) प्रवेश शुल्क. | ५,३००.०० | | (४) नोकरांचे भत्ते. | १,२२०.०० | |
| | | | | | ६८,१५०.०० |
| (३) शासनाकडून शिक्षण शुल्क परिपूर्ती. | १२,१२०.०० | | २. भविष्यनिधी हिस्सा— | | |
| | | | (१) शिक्षक | १,२७०.०० | |
| | | ६८,६२०.०० | (२) नोकर | ४६०.०० | |
| | | | | | १,७३०.०० |
| ३. अनुदाने— | | | | | |
| (१) शासनाकडून अनुदान. | ११,३००.०० | | ३. इमारत बांधणी खर्च. | | १९,१२२.५० |
| (२) नगरपालिकेकडून अनुदान. | ५,०००.०० | | ४. शाळेच्या इमारतीचे भाडे. | | ३,६००.०० |
| | | १६,३००.०० | ५. फर्निचर खरेदी. | | ४,६४०.०० |
| ४. बँकेकडून कर्ज. | | १०,०००.०० | ६. शिक्षण शुल्क परत. | | ७,७५५.०० |
| ५. बँकेचे व्याज. | | ४००.५० | ७. इतर खर्च | | २,६९०.५० |
| ६. देणगी .. | | १०,५००.५० | ८. शिल्लक | | ६४५.०० |
| | एकूण .. | १,०८,३३३.०० | | एकूण .. | १,०८,३३३.०० |

गुण २०

३. पुढील तक्ता एका कार्बन-प्रतीसह योग्य पद्धतीने टंकलिखित करा व रकान्यांच्या ओळी टंकलेखन यंत्राच्या साहाय्याने अथवा शाईने वा पेन्सिलीने आखा :

आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या वर्गांसाठी असलेल्या योजनेखाली सन १९६०-६१ ते १९६३-६४ मध्ये काही जिल्ह्यांत सरकारने केलेला खर्च दर्शविणारे विवरण

| जिल्ह्याचे नाव<br>१ | १९६०–६१<br>२ | १९६१–६२<br>३ | १९६२–६३<br>४ | १९६३–६४<br>५ |
|---|---|---|---|---|
| | रुपये | रुपये | रुपये | रुपये |
| मुंबई .. .. | १८,१३,७६८ | २७,५०,१६६ | ३५,३२,९९६ | ३७,८४,२६१ |
| ठाणे .. .. | ५,३६,०७२ | ७,४६,४५० | ९,१०,९०१ | १०,६६,३३१ |
| कुलाबा .. .. | ३,०६,९९७ | ४,४२,०५६ | १,५८,३७७ | ५,२३,२७१ |
| रत्नागिरी .. .. | ८,५८,९६१ | ९,५१,४१२ | १३,९८,४२१ | १६,८१,९७७ |
| नाशिक .. .. | ८,७१,०९५ | १३,९६,८२३ | १९,२०,४८५ | २२,५४,६६७ |
| धुळे .. .. | ५,४१,९३७ | ७,६९,८५१ | १०,१२,८०१ | १०,९७,८४७ |
| जळगाव .. .. | ९,७५,०२० | १५,६८,५१५ | १९,६९,५०१ | १९,७१,६७९ |
| अहमदनगर .. .. | ७,५६,२९३ | १०,५३,५५५ | १६,११,७९४ | १८,८०,८५८ |
| पुणे .. .. | १३,३४,८३० | १८,८७,०३८ | ३,१८,०४२ | ३०,९९,८६१ |
| सातारा .. .. | ९,०८,१९९ | १४,४८,७८६ | १८,६८,२२९ | २२,७८,८८० |
| सांगली .. .. | ९,६३,५४२ | १३,४८,१७३ | १७,७१,५३७ | २१,५०,७८० |
| सोलापूर .. .. | ९,६१,८११ | १४,६०,७१५ | १९,४९,८६७ | २१,८६,३८४ |
| कोल्हापूर .. .. | ९,२०,९४९ | १३,६५,५४७ | २०,१२,०३४ | २९,३८,५७७ |
| औरंगाबाद .. .. | २,३०,९०३ | ६,४५,५०७ | ६,८१,०९२ | ७,३४,५४७ |

# शुद्धलेखनाचे नियम

(१) अनुस्वार

नियम १ ला.—स्पष्टोच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदू द्यावा.

उदाहरणार्थ—तंटा, चिंच, आंबा, संस्कृत.

अनुनासिकाबद्दल विकल्पाने पर-सवर्ण लिहिण्यास हरकत नाही.

(अ) मराठी शब्दांत अनुनासिकाचा उच्चार जेव्हा खणखणीत स्पष्ट असतो, त्या वेळी शीर्षबिंदू लिहावा. म्हणजे अनुनासिकपूर्व अक्षरावर टिंब लिहून तो उच्चार दर्शवावा. परंतु काही शब्दांत हा उच्चार अगदी अस्पष्ट असतो, किंबहुना उच्चारला जातच नाही, तेथे ती अक्षरे अनुस्वारविरहितच लिहावी. उदा. हसणे, धावणे, सावळा, आतडे, घराणे, मेढरू, लेकरू, मी, आम्ही, तुम्ही (तृतीयेची रूपे), जातो-गेलो (प्रथम पुरुषी रूपे), हे, ते, जे, ही, ती, जी (नपुसकलिंगी रूपे), जेव्हा-तेव्हा, जो—तो (कालवाचक अव्यये) इत्यादी.

(आ) जेथे अनुनासिकाचा उच्चार स्पष्ट होतो, तेथे तो सामान्यतः शीर्षबिंदूनेच व्यक्त करावा. तथापि तत्सम म्हणजे संस्कृतमधून जसेच्या तसे मराठीमध्ये आलेले जे शब्द त्यामध्ये पर-सवर्ण लिहून तो व्यक्त करण्यास हरकत नाही. या सवलतीप्रमाणे कंकण, शंख, कुंज, पंडित, चंद्र, पंचमी यांसारखे शब्द कङ्कण, शङ्ख, कुञ्ज, पण्डित, चन्द्र, पञ्चमी असे लिहिण्यास हरकत नाही. देहान्त, देहान्त हेही असेच शब्द आहेत. परंतु तत्सम नसणारे मराठी शब्द शीर्षबिंदू देऊनच लिहावे. उदा. दंग, चिंच, खंत, उंट, भांग असे शब्द दङ्ग, चिञ्च अथवा चिन्च, खन्त, उण्ट, भाङ्ग असे लिहू नयेत. पर-सवर्ण लिहिण्याची सवलत फक्त तत्सम शब्दांपुरती मर्यादित आहे.

नियम २ रा.—य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह् यांच्यापूर्वी येणाऱ्या अनुस्वारांबद्दल संस्कृतप्रमाणे केवळ शीर्षबिंदू द्यावा. उदा. सिंह, संयम, मांस.

(सिंह, संयम, मांस इत्यादी शब्दांत अनुस्वाराचा स्पष्ट उच्चार करीत असता त्यानंतर व पुढील अक्षराआधी मध्ये 'य' कार किंवा 'व' कार उच्चारात येतो. उच्चारानुसारी लेखन व्हावे म्हणून कित्येक लोक सिंव्ह, संय्यम, मांव्स असे त्यांचे लेखन करताना दिसतात. अनुस्वाराचा उच्चार स्पष्ट व पूर्ण केला की आपोआपच 'य' वा 'व' उच्चारला जातो, म्हणून तो लिहून दाखविण्याची गरज नसते. लेखनात अनेक वेळा येणारे असे आणखी काही शब्द पुढे दिले आहेत : संशय, संरक्षण, संसार, संसृति, संहार किंवा संस्था, संवाद, संयोग, अंश, संस्कार इत्यादी. 'ल' पूर्वी असे स्पष्टोच्चारित अनुनासिक आल्यास आणखी एक 'ल' कार मध्ये लिहिण्याची क्वचित पद्धत होती; तसेही करण्याचे कारण नाही. सं-लाप = संलाप (संल्लाप नको).

नियम ३ रा.—नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्य रूपांवर विभक्ति-प्रत्यय व शब्दयोगी अव्यय लावताना अनुस्वार द्यावा. उदा. लोकांना, मुलांनी, तुम्हांस लोकांसमोर, घरांपुढे

[ वरील नियमातच 'नामांच्या' आणि 'सर्वनामांच्या' या शब्दांत अनुस्वाराचा उच्चार स्पष्ट होतच आहे. तो दर्शविण्यासाठी तेथे म्हणजे त्या शब्दांच्या सामान्य रूपाच्या अंत्याक्षरावर अनुस्वार येतोच. उदाहरणादाखल घेतलेल्या शब्दांत तो तितकासा स्पष्ट नसला, तरी अस्पष्टपणे उच्चारला जातो व त्यान्ला, लोकान्ला असेही उच्चार कित्येकांच्या तोंडी असलेले आढळतात. तेव्हा तो उच्चार सरसकट लिहून व्यक्त करावा हे युक्त होय.

या नियमाप्रमाणे चतुर्थीचे एकवचनी व अनेकवचनी स. ला हे प्रत्यय आणि सप्तमीचे एकवचनी व अनेकवचनी प्रत्यय, 'त' किंवा 'मध्ये' हे शब्दयोगी अव्यय नाम-सर्वनामास लावताना होत असणारा फरक विशेष लक्षात घ्यावा.

| | | |
|---|---|---|
| उदा. | मुलास (ए. वचन) | मुलांस (अ. वचन) |
| | मुलाला (ए. वचन) | मुलांला-ना (अ. वचन) |
| | घरात-मध्ये (ए. वचन) | घरांत-मध्ये (अ. वचन) |

इतर विभक्तिप्रत्यय आणि शब्दयोगी अव्यये यांच्याबाबतही हाच नियम समजावा. उदा. मुलाशी–मुलांशी, मुलाते–मुलांते, मुलाने–मुलांनी, गावाहून–गावांहून, घरावर–घरांवर इत्यादी. ]

नियम ४ था.—वरील नियमांव्यतिरिक्त कोणत्याही कारणासाठी व्युत्पत्तीने सिद्ध होणारे वा न होणारे अनुस्वार देऊ नयेत.

[ ज्यांचा उच्चार स्पष्टपणे किंवा अस्पष्टपणेही होत नाही, ते अनुस्वार देण्याचे कारण नाही ही भूमिका येथे घेण्यात आली आहे. यामुळे आतापर्यंत दिले जाणारे पुढील वेगवेगळ्या प्रकारचे अनुस्वार लेखनातून गळतील :

(१) नपुसकलिंगी ई-कारान्त, ऊ-कारान्त व ए-कारान्त नामांच्या शेवटी उभयवचनी येणारे अनस्वार; उदा. घरें, घरटीं, घोडें, घोडीं, लेकरूं, लेकरें, मोतीं, मोत्यें, नामें, रूपें, करणें, बोलणें इत्यादी. हे अनुस्वार लिहिता येणार नाहीत.

(२) लिंगानुसार बदलणाऱ्या विशेषणांच्या नपुसकलिंगी रूपांवर येणारे अनुस्वार; उदा. काळीं-गोरीं (मुलें), चांगलीं (फळें), पांढरीं (फुलें), वेडीं, शहाणीं इत्यादी. यातील अंत्याक्षरावरील अनुस्वार देता येणार नाहीत.

(३) अर्थभेद स्पष्ट व्हावा म्हणून दिले जाणारे अनुस्वार; उदा. नाव (नौका)–नांव (नाम), पांच (पंच)–पाच (रत्नप्रकार), कां (कारण)–का (काय), जो–तो (सर्वनामे)–जों–तों (कालवाचक क्रियाविशषणे), कीं (किंवा)–की (इतर अर्थाने). तसेच घांट–घाट, कांच–काच, वांचणें–वाचणे इ. हे अनुस्वार देण्याची गरज नाही.

(४) क्रियापदरूपांवरील पुरुषवाचक अनुस्वार; उदा. मी—आम्ही, जातों—गेलों, करितों—करीं, असें, करीत असृ, तुम्ही करितां, करां, गेलां, करीत असां; हे प्रथम पुरुषवाचक व द्वितीय पुरुषवाचक अनुस्वार देण्याचे कारण नाही. ते देऊ नयेत.

(५) नपुंसकलिंगी ए-कारान्त सर्वनामांवरील अनुस्वार; उदा. जें, तें हें (जीं—तीं—हीं ही अनेकवचनी रूपेसुद्धा) हे अनुस्वार आता गळाले आहेत.

(६) विभक्तिमूलक अनुस्वार सर्वच्या सर्व वरील नियमाप्रमाणे गळतात. तृतीयेचे नें, नीं, एं, हीं, शीं; चतुर्थीचा तें, सप्तमीचे त, ईं या प्रत्ययांवरील अनुस्वार देण्याची गरज नाही. रामें, रामानें, लोकांनीं, त्यांहीं, लोडाशीं, रामातें, घरांत, घरीं, दारीं हे शब्द अनुक्रमे रामे, रामाने, लोकांनी, त्यांही, लोडाशी, रामाते, घरात, घरी, दारी असे लिहावे.

(७) तां, तांना, ऊं या प्रत्ययांनी साधलेल्या धातुसाधितांवरील अनुस्वारही गळतात. जातां—येतां, जातांना—येतांना, जाऊं—करूं इत्यादी प्रयोगांतील अनुस्वार आता उरले नाहीत.]

(२) ऱ्हस्व-दीर्घ

नियम ५ वा.—तत्सम (ऱ्हस्व) इ-कारान्त आणि उ-कारान्त शब्द प्रथमेत दीर्घान्त लिहावे. उदा. कवी, मती, गती, गुरू. इतर शब्दांच्या अंती येणारा इ-कार व उ-कार दीर्घ लिहावा. उदा. पाटी, जादू, पैलू, विनंती, ही (शब्दयोगी अव्यय). अपवाद : आणि, नि.

स्पष्टीकरण.—परंतु, यथामति, तथापि इत्यादी तत्सम अव्यये ऱ्हस्वान्त लिहावी. तसेच सामासिक शब्दांतही तत्सम (ऱ्हस्व) इ-कारान्त व उ-कारान्त शब्द पूर्वपद असताना ऱ्हस्वान्तच लिहावे. उदा. बुद्धिवैभव, कविराज, गतिमान, गुरुवर्य.

[प्रथमेत म्हणजे प्रथमेच्या दोनही वचनांत, त्याप्रमाणे प्रथमेबरोबर अप्रत्ययी द्वितीयाही अभिप्रेत आहे. तत्सम ऱ्हस्वान्त शब्द मुळामध्ये ऱ्हस्वान्तच आहेत ही भूमिका येथे मान्य आहे. त्यामुळे समासांमधून ते तसेच उच्चारले जातात, म्हणून समासांत उत्तरपद नसताना ते तसेच म्हणजे ऱ्हस्वान्तच लिहावे. सामासिक शब्दांबरोबर गतिमान, गुरुवर्य इत्यादी साधित शब्दांनाही हाच न्याय लागू आहे. विभक्तिप्रत्यय आणि शब्दयोगी अव्यय लावताना ते दीर्घान्त उच्चारले जातात, म्हणून पूर्वीही दीर्घान्त लिहिले जात; परंतु प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यये लागलेली नसतानाही मराठीच्या स्वभावानुसार ते बहुधा दीर्घान्तच उच्चारले जातात, म्हणून प्रथमेत आणि अप्रत्ययी द्वितीयेत असता ते दीर्घान्त लिहावे असा या नियमाचा अभिप्राय आहे. कवि, गति, मति, स्थिति, दृष्टि, वृष्टि, अग्नि, अतिथि, अद्रि, पति इत्यादी शब्द याप्रमाणे दीर्घान्त लिहावे. अप्रत्ययी द्वितीयेची उदाहरणे—(१) मी तुझे हेतू जाणतो; (२) कौरवांनी विराटाच्या धेनू पळविल्या.]

नियम ६ वा.—(दीर्घ) ई-कारान्त व ऊ-कारान्त शब्दांतील उपान्त्य इ-कार व उ-कार ऱ्हस्व लिहावे. उदा. गरिबी, माहिती, हुतुतू, सुरू. अपवाद : नीति, भीति, रीति, कीर्ति इत्यादी तत्सम शब्द.

(तत्सम शब्दांची ही यादी आणखी पुष्कळच वाढविता येईल. प्रीति, भूमि, स्फूर्ति, दीप्ति, ऊर्मि, वीचि, विभूति इ. शब्द असे आहेत. हे तत्सम शब्द मुळात दीर्घान्त नसल्याने वस्तुत: प्रस्तुत नियमाच्या कक्षेत येऊ नयेत. परंतु नवीन लेखनाप्रमाणे ते प्रथमेत आणि अप्रत्ययी द्वितीयेत दीर्घान्त लिहावयाचे असल्याने ते दीर्घान्त शब्दच मानले जाण्याचा संभव आहे. म्हणून अपवाद-रूपाने त्याचा वेगळा उल्लेख केला आहे. इतर दीर्घ स्वरान्त शब्दरूपातसुद्धा उपान्त्य इ-कार व उ-कार उच्चाराप्रमाणे ऱ्हस्व लिहावे. उदा. बोलविता, मिळवितो, ठेविले इ.)

नियम ७ वा.—अ-कारान्त शब्दाचे उपान्त्य इ-कार व उ-कार दीर्घ लिहावे. उदा. गरीब वकील, वीट, सून, वसूल. अपवाद : ऱ्हस्वोपान्त्य अ-कारान्त शब्द; उदा. गुण, विष, मधुर, प्रचुर.

[असे आणखीही काही शब्द पुढे दिले आहेत :

(अ) विहीर, उंदीर, अमीर, फकीर, भरीव, कणीक, ठरीव, हुरूप, नाजूक, पूर.

(आ) अपवादभूत तत्सम शब्द—शुक, विधुर, मंदिर, जटिल, भिन्न, अखिल, अधिप, छिन्न, छिद्र, अंकुश, अंकुर, अद्‌भुत, अरुण इ. सर्वसाधारणपणे तत्सम शब्दांच्या मूळ रूपात बदल होऊ नये, मुळात त्यांचे जसे उच्चार होतात, तसेच ते कायम राहावे व केवळ विभक्तिरूपात किंवा शब्दयोगी अव्यये लागताना अपरिहार्य असे उच्चारा-नुसारी फरक त्यात करावे, इतर करू नयेत, अशी या नियमामागील भूमिका आहे. हे लक्षात घेऊन सामाजिक, कायिक, वाचिक, स्थानिक, इत्यादी इक-प्रत्ययान्त तत्सम शब्द ऱ्हस्वोपान्त्यच लिहावे. इतरत्रही हीच भूमिका लक्षात ठेवावी. तत्सम नसणारे भित, धुंद यांसारखे शब्द उच्चाराप्रमाणे ऱ्हस्वोपान्त्यच लिहावे.]

नियम ८ वा.—उपान्त्य दीर्घ ई-ऊ असलेल्या शब्दांचा उपान्त्य इकार-उकार उभय-वचनी सामान्यरूपाच्या वेळी ऱ्हस्व लिहावा. उदा. गरिबास, वकिलांना, सुनेला, वसुलाची, नागपुरास, जिवाला (प्राण, मन या अर्थी). अपवाद : दीर्घोपान्त्य तत्सम शब्द, उदा. शरीरास, गीतेत, सूत्रास, जीवास (प्राणी या अर्थी).

(तांदूळ, बेडूक, कापूस, ढेकूण इत्यादी शब्दांचे सामान्यरूप करताना उपान्त्य 'ऊ' राहात नाही. त्या ठिकाणी वरील नियमाचा उपयोग नाही हे उघड आहे. त्यांची रूपे बेडकांनी, कापसाची, ढेकणांना अशी होतात. तेथे उ ऱ्हस्व वा दीर्घ होण्याचा प्रश्न उपस्थित होत नाही. दीर्घोपान्त्य तत्सम शब्दात उपान्त्य ई-कार वा ऊ-कार ऱ्हस्व होत नाही याची आणखी उदाहरणे पुढे दिली आहेत : क्रीडा, लीला, वीणा, वीर, शीत, गीत, संगीत, दूत, पूजा, मयूर, भूत, पूर्व, चूर्ण, धूली, दीप, नीच, दीन, परीक्षा, पीठ, पीडा, नवीन, प्रवीण, इत्यादी.)

(३) किरकोळ

नियम ९ वा.—पूर हा ग्रामवाचक शब्द कोणत्याही ग्रामनामास लावताना दीर्घोपान्त्य लिहावा; उदा. नागपूर, संबळपूर, तारापूर.

नियम १० वा.—कोणता, एखादा ही रूपे लिहावी; कोणचा, एकादा ही रूपे लिहू नयेत.

नियम ११ वा.—हळूहळू, मुळूमुळू, खुटूखुटू या शब्दांतील दुसरा स्वर व चौथा स्वर दीर्घ लिहावा.

नियक १२ वा.—ए-कारान्त नामाचे सामान्यरूप या-कारान्त करावे. उदा. करण्यासाठी, फडक्यांना (म्हणजे फडके यांना), पाहण्याला, करणेसाठी, फडकेंना, पाहणेला यासारखी ए-कारान्त सामान्यरूपे करू नये.

नियम १३ वा.—लेखनात पात्राच्या किंवा वक्त्याच्या तोंडी बोलण्याची भाषा घालावी लागते. त्या वेळी तिचे स्वरूप बोलण्यातील उच्चाराप्रमाणे असावे. अन्य प्रसंगी तसे लिहू नये.

नियम १४ वा.—मराठीत रूढ झालेले पुढील तत्सम शब्द अ-कारान्त लिहावे : क्वचित, कदाचित, अर्थात, अकस्मात, विद्वान.

असे आणखी काही शब्द पुढे दिले आहेत : किंचित्, तद्वत्, तस्मात्, दैववशात्, श्रीमान्, धनवान्, भगवान्, विद्युत्, परिषद्, संसद्, सम्राट्, इत्यादी. हे शब्द क्वचित, कदाचित, अर्थात, अकस्मात, विद्वान असे लिहावे.

